


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# दीपावली

डिसेंबर १९६८
वर्ष २४ वें
मूल्य ४॥ रु.
खास क्रिकेट पुरवणी






अनुक्रमणिका

डिसेंबर १९६८
वर्ष २४ वे
मूल्य १॥ रु.

# दीपावली



## खास वार्षिक क्रिकेट पुरवणी

### श्रेयनामावली

**कथा :** तोड (खास ग्रामीण कथा) — **द. स. काकडे** ● अशान्त आत्मा— **ग. का. भडकमकर** ● सर्कस सुंदरीचे प्रेम (सत्यकथा) —**शि. शं. कार्लेकर**

**लेख :** त्रिनिदाद आणि टोबॅगो (उत्तरार्ध)— **माधव राजवाडे** ● धन्य ते गायनी कळा नाट्य परीक्षण. . . **चित्रगुप्त** ● पलंगापासून पलंगापर्यंत (उत्तरार्ध) — **राजाराम हुमणे**

शतकांचा बादशहा—**सुधीर वैद्य** ● कर्नल सी. के. नायडू—**अरविंद ताटके** ● ऋतुराज क्रिकेट—**वि. श्री. कराडकर** ● हाऊ इज दॅट ?—**सुधीर कणेकर** ● क्रिकेटची बॅट—**कृ. वि. पेठे** ● क्रिकेटची पानपुरी—**सदानंद चेंदवणकर** ● द्रुतगती गोलंदाजांचा प्रश्न—**प्रा. अविनाश केळकर.**

याशिवाय

**नेहेमीची व्यंगचित्रमाला**

आमचेही (एक) मत, दीपमाला, ऐसी अक्षरे रसिके मेळवीन, ही नेहेमींची सदरे

**दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

● संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१ खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किमत १॥ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. प्रकाशित चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत. Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio, 40/42, Kennedy Bridge, Bombay-4.













**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :

३५७७६५ DALALART

० **वर्गणीदारांस सूचना** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी** रु. १६

० **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

० **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

० **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

० **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल. ० **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१,खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.

# जग दिधले खेळांया—

**कविवर्य** केशवसुत 'आपल्या आम्ही कोण ह्या कवितेत म्हणतात की, 'आम्ही कवि लोक देवाचे लाडके असून देवाने आम्हाला हे अवघे जग खेळायसाठी दिले आहे. ' जग खळायला दिले आहे ' ही कल्पनाच मोठी हृद्य, मजेशीर आहे. जगणे ही क्रीडा आहे. जगणे हा खेळ आहे. वस्तु वस्तूत—व्यवहारात—बोलण्यात—चालण्यात—असण्यात आणि हसण्यात—गाण्यात आणि नाचण्यात—लिहिण्यात व वाचण्यात सर्वत्र क्रीडा आहे, ही भूमिका घेतली की त्यातून येणारा शीण काहीतरी 'री–क्रिएट' करीत जातो. क्रीडेत माणूस शिणतो, घामाघूम होतो पण पळून जात नाही. तर त्यातून एक नवीनच आनंदाची निर्मिती होत असते. काहीतरी, थोडेसे गमावून—लौकिक असे गमावून, तो अलौकिक, अवर्णनीय, दैवी असे मिळवीत असतो. तो आनंद श्रेष्ठतम असतो. शब्दांपलीकडचा असतो. म्हणूनच तर कला ही क्रीडा आणि क्रीडा हीही एक कलाच मानली गेली आहे. कलाकार सुंदराशी क्रीडा करीत असतो आणि खेळाडू आपल्या क्रीडेला कलापूर्णता आणण्याचा प्रयत्न करीत असतो. क्रिकेटची मॅच पाहताना मग आपण चटकन म्हणतो, " तो स्टाय्लिश खेळतो. " "त्याने ' सुंदर ' फटका मारला. " " त्याचे फूटवर्क पाहण्यासारखे असते. " "त्याचा लेगचा फटका वा त्याची सिक्सर अप्रतिम होती. " क्रीडेत कला व कलेत क्रीडा पाहण्याच्या दृष्टिकोनामुळेच " **दीपावली** " कलेइतकेच क्रीडेलाही महत्त्व देत आली आहे. दिवाळी अंकाइतकेच महत्त्व संगीत अंकाला व क्रिकेट अंकालाही देत आली आहे. कला जगायच्या असतील तर क्रीडा व क्रीडेची वृत्तीही जगली पाहिजे अशी ' **दीपावली** ' ची धारणा आहे. क्रीडा जगायच्या असतील तर त्यांनी कलात्मक रुप धारण केलेच पाहिजे.कलेचे शालू-शेले पांघरलेच पाहिजेत असे ' **दीपावली**' मानते. म्हणूनच कला व क्रीडा इथे हातात हात घालून नांदतात. त्याने ' **दीपावली** ' च सुंदर होत नाही तर अवघे जीवनच सुंदरतर, रुचिरतर व रसयुक्त होत जात असते. कला व क्रीडा हातात हात घालून गेल्या की तिथे वार्धक्याचा वारा शिरत नाही. नैराश्याची बाधा बाधत नाही.'चिरतारुण्य' हा तर कला आणि क्रीडेचा धर्म! तो तर त्यांचा आत्मा ! म्हणूनच आत्मा न गमावलेली '**दीपावली**' 'तरुण' '**दीपावली**' आज क्रीडेचा दीप हाती घेऊन, त्या क्षेत्रातल्या 'कला'कारांचा जयजयकार करीत पुढे आली आहे. क्रीडेला व कलेला विविध रूपे असली तरी कलेचे आणि क्रीडेचे आत्मतत्व एकच असते. मग 'क्रिकेट' हा 'परकी' खेळ रहात नाही. क्रीडेच्या भावनेनेच तो खेळला—पाहिला जाऊ शकतो. त्या आनंदाआड जात, पात, प्रांत, देश, वर्ण आणि वंश येत नाहीत. नायडू–निस्सार, मुस्ताक, मर्चंट, देवधर आणि अमरनाथ, वझीर आणि नाझीर सारखेच आनंद देतात. वॉरेल वा वली हॅमंड, ब्रॅडमन आणि सिंप्सन सारेच 'आपले' वाटतात. त्यांचे खेळणे कलेचा उच्चतम आनंद देऊन जात असते. क्रीडा संपली की कला संपली आणि कला रुसली तर क्रीडेतला आनंद उणा ठरेल. म्हणून कथेबरोबर कलेला आणि कलेबरोबर क्रीडेलाही ' **दीपावली** ' मानाचा मुजरा करीत आली आहे. मग ती क्रीडा ' क्रिकेट ' ह्या नावाने होवो वा अन्य नावाने! नाव गौण–क्रीडा महत्वाची ! कारण उच्चतम ' क्रीडा ' ही उच्चतम ' कला ' असते अशी आमची श्रद्धा आहे. त्या श्रद्धेतच ह्या अंकाचे संपादन घडले आहे ही गोष्ट आम्ही साभिमान नमूद करतो.

—आता उलटा पाने आणि ...... आम्ही तुमच्या रसिकतेचा अवमान करू इच्छित नाही.

—**संपादक**



अनुक्रमणिका








# आमचेंही (एक) मत

## दोन तपांची तपश्चर्या

स. न. वि. वि.

आपल्या दोन तपांची तपश्चर्या दि. २९।१०।६८ ला मिळाली. तपःसामर्थ्याची चुणूक चांगलीच दिली आहे आपण. ऐन दिवाळीमध्ये वाचकाना आनंद लुटण्यास आपण मदत केली होती, परंतु पोस्टाच्या 'गो स्लो' मुळे हा आनंद वाचकाना लुटता आला नाही. या 'गो स्लो' मुळे पोस्टाच्या कर्मचाऱ्याना 'पोस्त' मागायला तोंड राहणार नाही.

'दीपावली'चे ले-आऊट, छपाई, सजावट, व्यंगचित्रे, नवे व्यंगचित्रकार अशोक डोंगरे यांची जाहिरातीची विनोदी चित्रे, आपली चार चित्रे, सर्व काही आपल्या कीर्तीला साजेसेच आहे. अन्य कोणत्याही दिवाळी अंकात न लिहिणारे श्री. ग. त्र्यं माडखोलकर यानी करून दिलेला अंजनीबाई मालपेकर यांचा परिचय-लेख फार आवडला. एक भव्य व दिव्य व्यक्तित्व मराठी वाचकांसमोर उभे ठाकले. राजा रविवर्मासारख्या श्रेष्ठ चित्रकारालाही त्या व्यक्तित्वाने भारले होते हे पाहून तर त्यांच्याबद्दल मनात आदर उत्पन्न होतो.

अहमदनगर — आपला
३१-१०-६८ — **र. बा. केळकर**

## काहीतरी विशेष देणारी स्वरमंजिरी

स. न. वि. वि.

आपला यंदाचा 'दीपावली' विशेषांक ऐन दिवाळीत हातात मिळाला. अंकाची सजावट अप्रतिम वाटली. साहित्यिक मेजवानीतील कथा उत्कृष्ट आहेत. 'स्वरमंजिरी' तून काहीतरी विशेष मिळाले. आपले मनःपूर्वक अभिनंदन!

लामगाव — आपला
डिचोली-गोवा — **र. वि. प्रभुगांवकर**

## नवे कादंबरीकार भेटले

स. न. वि. वि.

'दीपावली'चा दिवाळी अंक तर अव्वल दर्जेदार आहेच. त्यातल्या त्यात 'प्रतीक्षा' ही कादंबरी अतिशय वेधक नि तितकीच उद्बोधक आहे. श्री. पेंढारकर याना आपण उजेडात आणले आहेच. तेव्हा त्यांची लेखणी अष्टपैलू बनविण्याची जबाबदारीही आपलीच आहे. यापुढे ते नेहमी 'दीपावली'त भेटावेत हीच अपेक्षा. सर्वोत्कृष्ट अंकाबद्दल धन्यवाद!

आपला
मुंबई — **य. स. दातार**

## वेगळ्याच वातावरणात नेले

स. न. वि. वि.

'दीपावली'चा दिवाळी अंक हाती येताच मी प्रथम कादंबरीच वाचायला घेतली नि ती पूर्ण झाल्याशिवाय अंक खाली ठेवलाच नाही. आजकाल कादंबरी म्हटली की स्त्रियांच्या अंग-प्रत्यंगाची उत्तान वर्णने, बीभत्स भाषा, बलात्कारादि प्रकार त्यात असायचेच असा जणु काही 'फॉर्म्युला'च ठरून गेलेला आहे; पण श्री. प्रभाकर पेंढारकर यांची 'प्रतीक्षा' कादंबरी वाचकाला एका अगदी वेगळ्या प्रकारच्या वातावरणात नेते. युद्धविषयक वातावरणातल्या घटना बारकाव्यांसह टिपलेल्या असल्याने जणु काही आपण प्रत्यक्षच त्या वातावरणात वास करीत आहोत असा भास होतो. ही रहस्यकथा नसली तरी पाक हेरांच्या कामगिरीमागचे गूढ रहस्य अखेरपर्यंत कायम ठेवण्यात लेखक शंभर टक्के यशस्वी झाले आहेत. श्री. पेंढारकर यांची ही पहिलीवहिलीच कादंबरी असूनही ती कसलेल्या लेखणीतून उतरल्यासारखी दर्जेदार झाली आहे. कादंबरीतील घटनांची चित्रेही सार्थ आहेत आणि त्यानी कादंबरीच्या रंजकतेत भरच घातली आहे. असे उत्कृष्ट साहित्य दिल्याबद्दल श्री. पेंढारकर यांचे अभिनंदन तर केलेच पाहिजे, पण कादंबरी-परीक्षकांच्या गुणग्रहणाबद्दल त्यांचे आणि आपलेही मनःपूर्वक अभिनंदन! स्पर्धेतील दुसऱ्या क्रमांकाची (श्री. रवींद्र पिंगे यांची) कादंबरी वाचण्याची उत्सुकता लागून राहिली आहे, ती केव्हा पुरी होणार?

घाटकोपर, मुंबई — **(सौ.) कौमुदी देशमुख**

## टपालखात्याला धन्यवाद (?)

स. न. वि. वि.

आपले पत्र मिळाले. त्यानंतर कालच 'दीपावली'चा दिवाळी अंकदेखील मिळाला. मुंबईवरून १६ ऑक्टोबरला पाठविलेले मासिक येथे १ नोव्हेंबरला पोचते करणारे आपले कार्यक्षम टपालखाते धन्यवादास पात्र आहे खरेच!

आपल्या मनात आशंका निर्माण झाली आणि आपणाला तसदी दिली याबद्दल दिलगीर आहो.

पाँडीचरी — आपला
२-११-१९६८ — **ग. दा. सुखदेव**

## अंक मिळाला हे नशीबच

स. न. वि. वि.

'दीपावली'चा दिवाळी अंक ३०।१० रोजी पावला. त्याच दिवशी आपले दि. २९।१० चे कार्डही पावले. अंक रजिस्टर केल्याची मुंबईची तारीख १६।१० होती व येथील पोस्टाचा शिक्का ३०।१० चा होता. त्यावरून रजिस्टर केलेला अंक मुंबई अगर हैदराबादच्या पोस्टात संपामुळे १०।११ दिवस पडून राहिला असे दिसते. आपल्या कार्डातील खुलाशाबद्दल धन्यवाद!

हिमायतनगर — आपला
४-११-६८ — **गो. वा. हर्डीकर**

अनुक्रमणिका




—माधव राजवाडे

क्रिकेटच्या क्षेत्रात अग्रभागी चमकत असलेल्या वेस्ट इंडीज संघाचे हे माहेर म्हणून आपण ओळखतो. त्या निसर्गरम्य भागाचे **श्री. माधव राजवाडे** यानी आगळे दर्शन दिवाळी अंकात घडविले त्याचा हा उत्तरार्ध. भारताच्या पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांनीही या देशाला नुकतीच भेट दिली.



'स्टीलबँड'वर नृत्य करणारे बेधुंद युगुल

इतर देशांप्रमाणेच त्रिनिदाद येथेही ख्रिश्चन धर्मोपदेशकानी पतितांचा उद्धार करण्याची जबाबदारी घेतली. कॅनेडियन धर्मोपदेशकानी भारतीय रहिवाश्यात आपल्या धर्मप्रसार व लोकोद्धाराच्या कामाचे जाळे पसरले आणि अमेरिकन इंडियन्स आणि भारतीय यांच्यातला फरक ठळक करण्याकरता त्यानी एकूण भारतीयाना 'ईस्ट इंडियन्स' ही उपाधी लावली. बऱ्याच भारतीयानी आपल्या मूळ श्रद्धा अबाधित ठेवल्या असल्या तरी काही थोडे भौतिक प्रलोभनाना व फायद्याना बळी पडून ख्रिश्चन धर्माला शरण गेले आणि याप्रमाणे ख्रिश्चन धर्माने या छोट्या प्रदेशातील मूळच्या हिन्दू लोकात मूळ धरले. या मुळाचीच श्रद्धेत वाढ झाली. स्थूल मानाने बोलायचे झाल्यास या बेटातील प्रत्येक तीन ईस्ट इंडियन हिन्दूंमागे एक ईस्ट इंडियन ख्रिश्चन असे प्रमाण आहे. या ईस्ट इंडियन ख्रिश्चन मंडळीनी शिक्षणात चांगली प्रगती केली आणि आज ही मंडळी त्रिनिदादच्या जीवनात मोठमोठ्या हुद्यावर असलेली दिसतात. सर्वसाधारणपणे भारतीय ऊस (साखर), भात शेती व व्यापार याना चिकटलेले व सरावलेले दिसतात. ईस्ट इंडियन व्यापारी जमात ही इतरत्र आहे तशी येथेही भरभराटीला आली असून त्यांच्यात अनेक लक्षाधीश आहेत. पैकी सहजगत्या उल्लेखनीय म्हणजे श्री. केवल मराज? (महाराज), श्री. जमादार, श्री. व्हेर्नान चार्लस हे होत. श्री. व्हेर्नान चार्लस यानी चालवलेल्या 'एक्स्प्रेस' वर्तमानपत्राची संस्थापनेपासून पाच वर्षाच्या आत रविवारच्या आवृत्तीच्या एक लाख प्रती एवढ्या खपाचा उच्चांक गाठला. श्री. चार्लस हे नुकतेच भारतात येऊन गेले ते दिल्लीतीत 'गे लॉर्ड'ला पोर्ट ऑफ स्पेनमध्ये खेचून नेण्यासाठी

त्रिनिदाद आणि टोबॅगोने इ. स. १९६२ सालच्या ३१ ऑगस्टला स्वातंत्र्य प्राप्त केले आणि तेथील राष्ट्रीय धारासभा अस्तित्वात आली. भारताचा स्वातंत्र्य दिनही ऑगस्ट महिन्यातच येतो. हा योगायोग या ठिकाणी मनात आल्याखेरीज राहात नाहीत. आफ्रिकन वंशाचे लोक जास्त असल्याने आफ्रिकन लोक सत्तेवर आहेत. परंतु

तेथील धारासभेत एकूण ३६ सभासदात १४ ईस्ट इंडियन आहेत. भारताप्रमाणेच त्रिनिदादमध्येदेखील एकमेकांविरुद्ध असलेल्या ईस्ट इंडियनांचे राजकीय पक्षांचे कडबोळे आहे. तथापि, डेमोक्रॅटिक लेबर पक्षास लक्षणीय व प्रेक्षणीय असे यश मिळाले असून ३६ जागांपैकी ११ जागा या पक्षाने पटकावल्या आहेत. श्री. भडासे सगन मराज ( महाराज ) यांच्या नेतृत्वाखालील पीपल्स डेमोक्रॅटिक पक्षाला केवळ एक जागाच लाभू शकली आणि तीही चालू वर्षाच्या जानेवारी महिन्यात. अर्थात् हे सांगण्याची आवश्यकता नाही की लिबरल पार्टी, वर्कर्स आणि फार्मर्स पार्टीसारखे पक्ष डेमोक्रॅटीक पक्षाशी मतभेद झाल्याने, अस्तित्वात आली.

त्रिनिदाद व टोबॅगो हा संपन्न प्रदेश असून दरमाणशी राष्ट्रीय मिळकतीचे प्रमाण ८७५ डॉलर पडते. म्हणजे भारतीय रुपयात अंदाजे ३९०० एवढी मिळकत ठरते.

## शिक्षकांची तीव्र उणीव

बऱ्याचशा ईस्ट इंडियन सांस्कृतिक संघटनांच्या कचेऱ्या बेटातच असून नवल असे की त्यांच्या सनातन धर्म, हिन्दु महासभा, आर्य प्रतिनिधी सभा, गांधी सेवा संघ इत्यादि संस्था आपल्याला परिचित आहेत. यांचा उगम अगदी अलीकडील आहे. सनातन धर्म, हिन्दु महासभा शिक्षणाच्या क्षेत्रात विशेष काम करीत असून चाळीस शाळा आणि दोन कॉलेजेस चालवते. असे कळले की, हे शिक्षण-सत्र अपुऱ्या अध्यापक वर्गाकडून चालविले जाते. बहुतेक साऱ्या शाळातून हिन्दी शिकवले जात असले तरी रीतसर प्रशिक्षण प्राप्त झालेल्या शिक्षकांची उणीव वरील संस्थात आहे. सेंट ऑगस्टीन् येथे स्थित वेस्ट इंडिज विश्वविद्यालयाने ॲफ्रो-अेशियन अभ्यासक्रमाचा विभाग इ.स. १९६८ साली उघडला असून तो विभाग 'इंडियन कौन्सिल फॉर कल्चरल रिलेशन्स' व प्रतिनियुक्त केलेल्या प्रा. एन. के. हल्दर यांच्या नेतृत्वाखाली आहे.

त्रिनिदाद हे प्राधान्याने कॉस्मॉपालीटन आहे. तेथील लोकसंख्येत निग्रो आणि ईस्ट इंडियन्सखेरीज इंग्रज, फरेंच, स्पॅनिश, पोर्तुगीज, लॅबॉनीज आणि चिनी यांचा समावेश आहे. पण इंग्रजी हीच सर्वांची भाषा; क्रिकेट हाच त्यांचा खेळ. इंग्रज माणसांचा नीटसपणा आणि सुरेलपणा ही मुख्यत्वे सुव्यवस्थित असलेल्या हिरवळीतून ठीकठीक ठेवलेल्या इमारतीतून, वाकबगार नागरी शासन व सेवेतून आणि आंग्ल सामान्य कायदा आणि आचार यातून अभिव्यक्त झालेले दिसतात. इतर बेटात मेळे होतात पण त्रिनिदादमध्ये जी ओढ, चुरस आणि जिद्द मेळ्यात दिसते ती एकमेवाद्वितीय होय. त्रिनिदाद म्हणजे कॅलिप्सो इतके अविभाज्य समीकरण असले तरी सूर्यास्ताच्या वेळी मसजिदीतून पैगंबरला मारलेल्या आर्त हाकेने, आलेल्या पाहुण्याला कॅरीबियनच्या पूर्वेकडे जाण्याचा मोह झाल्याशिवाय राहात नाही. असं असलं तरी पाहुणा त्रिनिदादमध्येच हिंदूंची समुद्राकडे जाणारी मिरवणूक पाहण्याकरता थबकलेला असतो. पूर्व किनाऱ्यावर मंझीव्हिला बीचची हिन्दूनी आपल्या वार्षिक धार्मिक विधीसाठी अक्षरशः गंगोत्री केलेली प्रत्ययास येते. वर्षानुवर्षे वांशिक सरमिसळ व समरसता यामुळे त्रिनिदादमध्ये असे काही काव्यमय कौमार्य आणि सौंदर्य निर्माण झाले आहे की, जे प्रत्यक्षात अतिशय उत्तेजक असल्याचे अनुभवास येते.



कार्निव्हल : एक वार्षिक समारोह

## लोककलेचे माहेर कॅलिप्सो

कॅलिप्सोत असेच एक ज्वानीचे चारूत्व आहे जे अस्सल लोककलेत विकसित झाले आहे. यातील संगीत हेलावून सोडणारे आणि काव्य



कार्निव्हलचे हे आणखी एक रूप

विनोद प्रचुर, विडंबनयुक्त, खिजवणारे आणि असंख्य गुदगुल्या करणारे असे असते. त्यात व्रात्यपणा, खटचाळपणा आणि अवखळपणाचा अंशही कमी नसतो. कॅलिप्सोचा विषय उच्चस्तरीय भानगडी कुलंगडीपासून तो साध्या प्रणय गीतापर्यंत असतो. आपल्याला जे ईस्ट इंडियन त्रिनिदादकर माहीत आहेत त्या श्री.व्ही. एस. नाईपॉलच्या मते कॅलिप्सो म्हणजे अफाट पोवाडा, मस्त लावणी, 'एक कोपरखळी' ( The Punch ) आणि त्रिनिदादचा 'न्यू यॉर्कर' होय. खरेच कॅलिप्सो म्हणजे हे सारं आणि आणखीन् काही असं म्हटल्यास मुळीच अतिशयोक्तीचे ठरणार नाही. पश्चिम आफ्रिकेच्या गुलामानी कॅलिप्सो प्रकार त्रिनिदादला आणला. याचा उगम शेतात जेव्हा गुलाम आपल्या यातना, आपले भय आणि आपल्या आशा आळवत तेव्हा झाला. जेव्हा गुलामी गेली तेव्हा या गीतांचा अस्तित्वात असलेल्या प्रथांशी मेळ घालणे व संयोग करणे हे ओघानेच उत्स्फूर्त करणारे सोपे काम होते. माध्यम तर हातीच होते. फक्त त्याच्या आविष्काराचे वळण वदलायचे होते. ते मोकळ्या व मुक्त वातावरणात झाले व कॅलिप्सो नृत्य व संगीताने थवथवले व मुसमुसले. म्हणूनच आपल्याला कळते की, ग्रीक साहित्यातील ज्या मोहक अभिसारिकेने युलीसिसला पेनेलोपला विसरायला लावले ती कॅलिप्सोची प्रेरणा ठरू शकत नाही. कॅलिप्सो शब्दाच्या व्युत्पत्तीचे मूळ फ्रेंच शब्द करॉसाँ ( Carroussean ) आहे. याचाच आंग्ल अपभ्रंश कॅलिसो आणि कॅलिसोचे परिणामतः जे राष्ट्रीकरण झाले ते म्हणजे कॅलिप्सो होय. एके संध्याकाळी जेव्हा मी मोकळा होतो तेव्हा कॅलिप्सो गीत प्रकार ऐकायला मिळाला. त्यातील दोन विशेष अन् वात्रट गीते येथे उद्धृत करण्याचा मोह अनावर आहे.

I. 'Me mama told me long ago
to keep away from worthless joe
If I heard what me mama say,
I would not be in this mess to-day.'

**'क्लीन बोल्ड'**



**दारूबंदी ७ वर्षेपर्यंत पुढे ढकलली !**

II. I had a girl quite fat and tall,
She went to the masquerade–newspaper ball,
But her dress caught fire & torn her attire
front page, back page, sporting section and all!

## रिकाम्या पिंपातून नादब्रह्म

कॅलिप्सो संगीत प्रकार असा आहे की, कोणत्याही पर्यटक, प्रवासी आणि पाहुण्याचे त्याकडे लक्ष व मन वेधल्याखेरीज राहात नाही. परंतु त्याची नजर खिळून राहते तो शुष्क तेलाच्या पिंपाचा मृदंग किंवा ढोल संगीताकरता वनवण्यात आलेला असतो त्यावर. आपल्या भारतात ही पिंपे वंगणाकरता किंवा डांबराकरताच आहेत असे ती पिंपे पाहताच मनापुढे जे येते ते त्रिनिदादमधील कॅलिप्सो संगीतावरोबर जो या पिंपांचा ताल व नाद लागलेला असतो ते पाहिल्यावर साफ पुसले जाते. आपल्याकडे पिंप रिकामे झाले की माळी त्यांचा उपयोग, रोपांचे द्विपाद आणि चतुष्पाद यापासून भ्रष्टीकरण थांववावे व संरक्षण व्हावे म्हणून करतो. कधीकधी पाम वृक्षांना शोभा आणणारे अवगुंठनही वनते हे पिंप. पण हेच पिंप त्रिनिदादकरांच्या हातात द्या आणि काय चमत्कार होतो तो पाहा. उष्णतेचा शेक व हातोड्याचे आघात घेत याच नीरस व व्यर्थ वाटणाऱ्या पिंपातून नादब्रम्ह सामावून असलेले एक विलक्षण वाद्य साकारते, झंकारते. नृत्यांगना याच वाद्याच्या तालावर प्रेक्षक-श्रोत्याना पाहता पाहता आपल्या ताब्यात घेतात अशी जादू करते हे वाद्य. ओवडधोवड आणि गद्य विरूप असलेल्या पिंपाचे हे सुसंस्कृत स्वरूप पाहून दर्जेदार संगीतज्ञाना वाटते की, हे वाद्य म्हणजे भावी वाद्यवृन्दाच्या नाद-ब्रम्हाचे वलस्थान व आशास्थान होय. हा पिंपाच्या वाद्याचा संगीत संच जो असतो तो चाळीसचा असतो. पिंपाचा प्रत्येक भाग योजनापूत आकाराचा असतो आणि त्याचे ताल धरण्याचे विशिष्ट कार्य असते. सर्वसामान्यपणे त्याचे तीन प्रकार असतात ते असे : (१) पिंगपॉंग्स् जे 'मेलडी'ला प्रवर्तीत करतात. (२) टिन बूमस् जे 'हार्मनी' सिद्ध करतात आणि (३) वासबूमस् स्टील बॅन्ड जरी वास्तविक केवळ वीस वर्षांच्या काळात निर्माण झाला असला तरी आज मात्र तेल कंपन्यात आपसात आपलाच स्टील बॅण्ड सकस व सरस ठरावा याची कमालीची शर्यत लागलेली आहे.

## नव्या वाद्याचा शोध कसा लागला?

या स्टील वॅडचा उद्भव मोठा रंजक आहे. आफ्रिकन वंशाचा एक तरुण एका फटफटणाऱ्या टिनातून ध्वनी काढत असताना त्याचा ( टिनाचा ) पृष्ठभाग खडकावर आदळला. हा पृष्ठभाग मृदु आणि नीट करावा म्हणून जेव्हा त्याने त्यावर हातोडा घणघणला तेव्हा त्याला उमटलेल्या ध्वनीत स्वरांची खूण सापडली. जेव्हा त्याने पृष्ठभागाच्या दुसऱ्या अंगास हातोड्याने आघात केला तेव्हा आणखीन् वेगळा ध्वनी घुमत असल्याचे जाणवले. अशा रीतीने पाच वेगळे ध्वनी कानाने टिपले तेव्हा 'Mary had

[ पान ५८ वर पहा ]







# धन्य ते गायनी कळा

'आज भोबे आपल्यात हवे होते' असे मला प्रकर्षाने जाणवत होते. भोबे यांचे नाटक—पहिले वहिले (व अखेरचे ठरलेले) नाटक रंगमंचावर आले होते. दामोदराच्या चरणी नाटक (व मग स्वतःचा देह) अर्पण करून भोबे गेले. देह गेला. नाटक राहिले. नाटकाच्या रूपाने कला राहिली. भोब्यांचे शब्द राहिले. त्यातले भाव राहिले. तानसेनची वेदना त्याची राहिली नाही. ती तर होती भोब्यांचीही वेदना. ह्या दोन वेदना एकात्म झाल्या आणि "**धन्य ते गायनी कळा**" नाटकाचा जन्म झाला. पण नाटक पाहताना मला मात्र सारखे वाटत होते "आज भोबे असायला हवे होते." आपल्या नाटकाचा पहिला प्रयोग पहायला ते नव्हते म्हणूनच केवळ वाटणारी ती खंत नव्हती. जर भोबे असते तर ह्या नाटकातल्या उणीवा त्यांनी राहू दिल्या नसत्या असे वाटून मला तो विचार सुचला होता. नाटक 'तालमीत' पक्के होते असे म्हणतात. असा अनुभवही आहे. प्रयोग होईपर्यंत व कधीकधी तर प्रयोग झाल्यानंतरही नाटक घडतच असते. कथाकादंबरी—कविता होते. नाटक घडते. त्यामुळेच '**धन्य ते गायनी कळा**' चा निर्माता नाटक घडत असताना ह्यात नव्हता ही गोष्ट तशी दुर्भाग्याची म्हटली पाहिजे.

पण ह्या नाटकाच्या बाबतीत दुर्भाग्य हे येवढे एकच ! बाकी सारे भाग्य योगच म्हटले पाहिजेत. नाटक – संगीत – अभिनय इत्यादि अनेक बाबतीत सारे भाग्ययोग भोब्यांच्या नाटकाने साधले आहेत. नाट्य दिग्दर्शक आहेत **मो. ग. रांगणेकर,** संगीत —पंडित **भीमसेन जोशी,** नेपथ्य—**रघुवीर तळाशिलकर,** पार्श्वसंगीत— **स्नेहल भाटकर,** प्रकाश योजना—**श्याम आडारकर** —ही सारी यादी तशी अपेक्षा वाढविणारी आहे. नाटकाला जे कलाकार लाभले आहेत— त्यांची नावेही अपेक्षा उंचविणारीच आहेत असे म्हटले तर वावगे ठरू नये. रामदास कामत (तानसेन) श्रीपादराव नेवरेकर (सोमनाथ) कृष्णराव चोणकर (मदनराय) भिकु पै आंगले (राजा रामचंद्र) लता काळे (रूपवती) ह्या कलाकारांची नावे काहीएक अपेक्षा उत्पन्न करतात. सौ. माणिक वर्मा हे संगीताच्या क्षेत्रातले एक मोठे नाव. त्यांची कन्या कु. **भारती वर्मा** ह्या नाटकातली तानसेन कन्या पूर्णेची भूमिका करतात. केवळ माणिक कन्या म्हणून नव्हे तर त्यांच्या संगीताचा वारसा घेऊन आलेली ही मुलगी "हम भी कुछ कम नही" हे सिद्ध करण्याच्या जिद्दीने काम करते. ह्या साऱ्या भाग्य योगाबरोबरच आणखी एका गोष्टीचा उल्लेख मुद्दाम उल्लेख करणे मी कर्तव्य मानतो. ती गोष्ट म्हणजे भोबे यांनी देवाच्या चरणी वाहिलेल्या ह्या नाटकाची प्रयोगावृत्ती तयार करण्याचे कामी ख्यातनाम नाटककार प्रा. वसंत कानेटकर यांनी घेतलेले परिश्रम ! भोबे जिवंत असते तर ही प्रयोगावृत्ती करीत असताना तेच धडपडत राहिले असते. भोबे ह्यांच्या ठिकाणी जिद्द होती. तशीच धडपडही होती.

तरीही भोबे यांची ही पहिलीच नाट्यकृति कला,दृष्ट्या 'पूर्ण' व्हायच्या आतच ते देवाघरी गेल्याने कुणातरी समर्थ व नाट्यदृष्ट्या जाणकार माणसाचा हात नाटकाला लागणे आवश्यक होते. तसा हात श्री. कानेटकर यांचा लागला. मूळ बाज भोब्यांचा. त्याला धक्का न लावता कानेटकरांनी ' न्याय ' दिला आहे हे नमूद केलेच पाहिजे.

'धन्य ते गायनी कळा' हे नाटक भोबे यांनी आपल्या "संगीत-सम्राट रामतनु मिश्र" ह्या ' दीपावली 'त प्रसिद्ध झालेल्या कथेवर आधारलेले आहे. ' रामतनु मिश्र' हे नाव मागे पडले आणि त्या नावाने ओळखल्या जाणाऱ्या व्यक्तीला भारताने मनात व संगीतात स्थान दिले ते ' तानसेन ' ह्या नावाने. तानसेनच्या संगीताप्रमाणेच त्याच्या लौकिक जीवनाबद्दलही बरेचसे कुतुहल होते आणि आहेही ! संगीतातील अनेकविध सिद्धी प्राप्त झालेल्या ह्या माणसाच्या वाटचाला शेवटी जे जीवन आले ते मानहानीकारक होते, त्याच्या जीवनात जे चढ-उतार आले त्यातही त्याची 'वेदना' कायम होतीच. आणि चरित्र–नाट्याला नेमकी ही वेदना पकडता येणे आवश्यक होते. श्री. भोबे ह्यांनी तानसेनची वेदना नेमकी पकडली आहे. त्यामुळे हे चरित्र–नाट्य स्थूल चरित्रवजा, नीरस झाले नाही. त्यात नाट्य आले. संघर्ष आला. त्याची वेदना ही केवळ त्याची राहिली नाही. तिला वैश्विक व्यापकता आली. ग्वाल्हेरला जन्मलेल्या तानसेनला ग्वाल्हेरबद्दल तिरस्कार कां ह्याचे उत्तर पहिल्याच अंकात मिळते आणि जे घडते ते केवळ तानसेनबाबतच घडते असे वाटत नाही. तत्कालीन समाजस्थितीवरही नकळत प्रकाश पडतो. आपल्यातलेच एक रत्न आपण पारखू शकलो नाही. ते आपण होऊन दूर लोटले असे वारंवार होत गेले आहे. समाजमानसाचे हे विकृत विभ्रम कला–साहित्य–शास्त्र–विद्यांचे बाबत असाच ' कौल ' देत आले आहेत.

रामतनु मिश्र ह्याला संगीतातल्या सिद्धी प्राप्त झाल्या होत्या–सिद्धीतून येतो अहंकार आणि अहंकारातून घडतो आत्मनाश. असेच ' सिद्ध ' पुरुषांबाबत घडले आहे. रामतनुबाबत हेच घडले आहे. ह्या नाटकातली रामतनूची शोकांतिका अखेर त्याची रहात नाही. कलेच्या साधकाना ती एक नवी व विशाल दृष्टी देऊन जाते. वैभवाने तानसेन दिपून गेला. ते दिपून जाणे मानवी होते. आणि वैभवाने सारे मान विकत घेता येतात हा त्याचा अहंकारही मानवी होता. त्याला वृंदावनला लाभलेला अनुभव ही एक ' मात्रा ' होती. त्याचाही त्याने 'विकृत' अर्थ लावला. पण तरीही तो संयमाने वागला. आव्हाने स्वीकारीत जाणारा तानसेन अकबराकारणे सर्व ' सिद्धी ' लावून पंख तुटलेल्या गरुडासारखा झाला आणि मला ' नायक ' होता आले नाही ह्या वेदनेने मेला. ह्या नाटकात त्याचे मरण दाखवलेले नाही. (कथेत आहे. ) फक्त मुलीला तो म्हणतो, "आशीर्वाद! बेटी, तुला मी आशीर्वाद काय देणार ? तुला आशीर्वाद एकच. तुझा दुर्दैवी पिता ज्या मार्गाने गेला त्या मार्गावर चुकूनदेखील पाऊल टाकण्याचा मोह तुला न होवो. गा. बेटी गा. 'स्वतःच्या मस्तीत धुंद होऊन गा. पण जे गाशील ते स्वतःसाठी गा. फक्त स्वतःसाठी! !

सांजवात मम गात भैरवी
फुलत रहा– तू गात रहा ॥
बाग बहरला परी फुलांचा
सुगंध मी कनकाला विकला
चांद उजळला प्रकाश सारा
मोहाच्या मेघात हरपला ॥
स्वरकमलांचा हार पाखरा
हृदयातिल देवास वहा॥

इथे तानसेन अशा धुंदीत संपतो.

ह्या नाटकांत नाट्य आहे. पण नाट्य वहरून आलेले नाही. उदाहरणार्थ, दीपक राग गाण्याचे आव्हान हे फार मोठे आव्हान त्याला होते. त्या बाबतचा गानपूर्व संघर्ष आणि प्रत्यक्ष तो प्रसंग हे फारसे ' उत्कट ' झाल्याचे जाणवत नाही. ' दीपका 'चे गायन हे कुठे वेदना, हुरहूर, मनस्विता उत्पन्न करून जात नाही. वृंदावनातील प्रसंगही असाच जुजबी वाटतो. तेथे नायकपदाची कांक्षा धरून आलेला तानसेन,काही पणाला लावून गातो आहे असे जाणवत नाही. नायकमंडळीही (अपवाद–सुरेश केंकरे–) 'धरून ' आणल्यासारखी व एकूण अप्रबुद्ध असल्यासारखीच वाटली. त्याच्या (तानसेनच्या) आयुष्याला आमूलाग्र वळण लावणारा हा प्रसंग आहे. तो अधिकच फुलायला हवा होता. दीपक गायलेल्या तानसेनला वाचविण्यासाठी पूर्णा मेघमल्हार गाते. तिचा तो मेघमल्हार तर केवळ विजांमुळे आणि ढगांमुळेच कळतो. दिसतही नाही. (रंगमंचावर अंधार) आणि जाणवत तर नाहीच नाही. हाही एक फार उत्कट प्रसंग असाच झटपट (व उत्कट न होऊ देता) उरकण्यात आला आहे हे जाणवते. मला स्वतःला आणखी असे वाटते की ह्या नाटकातली रूपवती आणखी 'समर्थ' व्हायला हवी होती. रूपवतीने पूर्णेला मल्हार (व इतरही राग) शिकवले हे समजून आल्यानंतरचा प्रसंग अधिक 'उत्कट' व्हायला हवा होता. दीपक गाऊन आतून होरपळलेला तानसेन दरबारातून घरी येतो तोही एका महालातून दुसऱ्या महालात आल्यासारखा– "आग – आग सर्वांगाची आग होते आहे " असे तो म्हणतो–पण जाणवत नाही. ती आग खरी आहे हे जाणवणे अगत्याचे आहे असे मला वाटते. ' रूपवती 'च्या व्यक्तिरेखेत काही गहिरे रंग भोबे यांनी भरले आहेत. गूढ रम्य व्यक्तित्व तिला दिले आहे–हे गूढरम्य व्यक्तित्व लता काळे फार चांगले व संयमित अभिनयाने, सुरेख विभ्रमाने उभे करतात ही जमेची बाजू. संगीताच्या सामर्थ्याची जाण रूपवतीला आहे हे जाणवत राहते. ती तानसेनची 'प्रेरणा' होती हे जाणवत राहते. नाटकभर मला स्वतःला 'रूपवती 'ची निर्मिती आवडली. तिला अधिक वाव मिळणे अगत्याचे होते असे मात्र वाटत राहते.

(पृष्ठ ५२ पहा)










# अशांत आत्मा



असापूर : कैद्यांचा नरक.

अेन पावसाळ्यातल्या अमावास्येची भयाण रात्र. सुसाट वादळ आणि धुवांधार पावसानं थैमान घातलं होतं. गडगडाटासह वीज चमकून सृष्टीचं जे रौद्र स्वरुप दिसे त्यामुळे, अनेक भयंकर गुन्ह्याना सरावलेल्या फत्तरदिल कैद्यांच्या हृदयातदेखील अमावास्येच्या काळोखा-सारखी भीती दाटून येत होती. पावसाचा जोर वाढत होता. वारा आडवातिडवा भन्नाट झाला होता. कैदी आपापल्या बरा-कीत अंग चोरून अवघडून घेत सरकारच्या नावानं शिव्या मोजीत चडफडत बसले होते. क्वचित् कुणाच्या विडीच्या झुर-क्याच्या वेळी ठिणग्या उडत होत्या.

असापूर.

कैद्याना तुरुंगवासाची शिक्षा देण्यासाठी ब्रिटिश सरकारनं असापूर हे आडवळ-णाचं गाव नेमकं शोधून काढलं होतं. उत्तर प्रदेशातल्या एका तालुक्याच्या गावा-पासून सात–आठ मैलांचा पायवाटेचा रस्ता तुडवत जावा लागे. घनदाट झाडांच्या, विषारी वनस्पतींच्या, रोगट हवामानाच्या, उडत्या आणि सरपटत्या प्राण्यांच्या, त्या नंदनवनात ब्रिटिश सरकारनं कैद्यांसाठी नरक उभारला होता. तुरुंग ! काळ्या-कभिन्न, अजस्र दगडांच्या उत्तुंग भिंती. किल्ल्याच्या दरवाजासारखा भलामोठा दरवाजा. आतल्या भागातल्या, मोठमोठ्या लोखंडी जाळ्यानी तयार केलेल्या बराकी. बराकींवर छपराऐवजी अर्धवट लोखंडी जाळ्या टाकल्या होत्या. असापूरच्या उन्हाळ्यातला ऊष्मा, पावसाळ्यातलं पाणी आणि हिवाळ्यातला गारठा या गोष्टी पराकाष्ठेच्या होत्या. ऊष्मा, पाणी आणि गारठा यांपासून कैद्याना संरक्षण मिळणार नाही याची कटाक्षानं काळजी घेण्यात आली होती. बराकींसमोरच्या मोकळ्या भागात, उन्हाळ्यात विशेष तापणाऱ्या उन्हात कैद्याना सक्तीची कामं करायला लागायची. पाण्याचं दुर्भिक्ष असायचं. तुरुंगा-पासून अनेक मैल अंतरावर असलेल्या ओहोळवजा नदीतून कैद्याना रक्षकांच्या कडचातून पाणी आणावं लागे. नियमा-प्रमाणे कैद्याना दिवसाकाठी फक्त एक फुलपात्रभर पाणी प्यायला मिळे. कैद्यानाही कर्दनकाळ वाटावेत असे एकाहून एक अवाढव्य आणि क्रूर जेलर्स बदली-

वदलीने इसापूरला येत. हे अक्राळविक्राळ जेलर्स उन्हात तापत काम करणाऱ्या, मनगट आणि दंडानं घामाच्या धारा टिपत काम करणाऱ्या कैद्यांसमोर माठातलं थंडगार पाणी घटघटा पीत. त्यावेळी कैद्यातला गुन्हेगार मरून पडे आणि ते पाण्याच्या एका थेंबाकरिता भिकाऱ्याच्या लाचारीनं जेलरकडे पाहू लागत. कैद्यांकडे पाठ फिरवून जेव्हा जेलर निघून जाई, तेव्हा त्यांच्यातला गुन्हेगार चवताळून उठे आणि जेलरला शिव्यांची लाखोली वाही. शिव्या देण्यापरिस कैद्याना काय करता येण्यासारखं होतं ?

. . . .त्या अमावास्येच्या रात्रीचा बाराचा सुमार. पावसाची रिपरिप कमी झाली होती तरी भुरभुर चालूच होती. भोवतालच्या घनदाट झाडांवरून टपटपणाऱ्या पागोळ्यांचा आवाज स्पष्ट ऐकू येत होता. कुठेतरी उतारावरून रों रों करीत पाणी वाहात असल्याचं जाणवत होतं.

बराकींमधून असलेल्या भितीलगतच्या दगडी कट्ट्यांवर अवघडून बसलेले कैदी पेंग काढीत होते. आडवं पडण्याची सोय नव्हती. कट्ट्यांवर पाणी साठलं होतं. कैद्यांच्या अंगांवरचे, बुडांखालचे कपडे चिंब झाले होते.

नेहमीचा परिचित एक टोला पडला. रखवालीवरचे शिपाई खडबडून जागे झाले.

त्या मागोमाग आवाज झाला . . . .

" टो ऽ ऽ टल. "

बराक नंबर एक. पँतीस

बराक नंबर दोन. पँतालीस

बराक नंबर तीन. तीस

सातही बराकींवर रखवालीसाठी असणाऱ्या शिपायांनी आपापल्या बराकीत असणाऱ्या कैद्यांचा आकडा पुकारून सांगितला.

. . . आणि . . .

अचानक वारा वाहू लागल्याचा भास झाला. आठ नंबरची बराक रिकामी होती तरीही अज्ञात आवाजानं पुकारा केला. . बराक नंबर आठ फॉर्टी फाइव्ह, . . .

> **. . . . विल् मला खोदून खोदून विचारीत होता, सॅमसन साहेबानं तुला कशासाठी बोलावलं होतं? त्यानं काय सांगितलं? तिथं तुला मारिया दिसली का? कशी होती ती . . . . मी काही बोललो नाही. एकटाच बाजूला जाऊन हमसून हमसून रडलो . . . .**

फॉर्टी फाइव्ह. आवाज विरत जातो न जातो तोच भूकंपाचा धक्का बसावा तशी भुई थरथरायला लागली. झाडं सळसळू लागली. कारागृहाच्या प्रचंड भिंती धडधडू लागल्या. आठव्या बराकीचे दणगट लोखंडी दरवाजे गदगदू लागले. प्रथम हळूहळू. नंतर जोराजोराने. खड् खड् खड् खड्. खडाड् खड्. खाड् खाड् खाड् खाड्. सगळ्या कैद्यांची भीतीने गाळण उडाली. दर पंधरा दिवसानी या गोष्टीचा अनुभव घेणारे जुने कैदीदेखील दरवेळी भयग्रस्त होत. तिथे मदनलालसारखा आठ दहा दिवसांपूर्वीच आलेला कैदी घामाने दरदरून निघाला नसता तरच नवल ! नक्की काय होतंय् याचा त्याला बोध होत नव्हता. बराक नंबर आठच्या दारांची विलक्षण गदगद होत होती. त्या गदगदीतूनच खोल

## ग. का. भडकमकर

दरीतून यावा तसा, चवताळलेला आवाज येत होता " साथियों ऽ ऽ ऽ ! तुमने मुझे धोखा दिया है. मैं तुम्हे कभी माफ नही करूंगा. " याच आवाजाचे अनंत प्रतिध्वनी आसमंतात उठत होते . . . तुमने मुझे धोखा दिया है . . . मैं तुम्हे कभी माफ नहीं करूंगा . . . तुमने मुझे धोखा दिया है . . . मैं तुम्हे कभी माफ नही करूंगा . . . तुमने मुझे धोखा दिया है . . . "

प्रतिध्वनी उमटतच होते. कैदी विस्फारल्या डोळ्यानी, मिणमिणत्या प्रकाशात एकमेकांकडे पाहात होते. मदनलालला कशाचाच उमग पडत नव्हता. त्या भीतीनं घेरलेल्या वातावरणात, आपला शेवट भयानक परिस्थितीत होणार आहे याची त्याला खात्री पटत होती.

दारांची गदगद, भुईची थरथर, झाडांची सळसळ कमी कमी होत गेली . . .अखेर कमी झाली . . . शेवटी सारं काही थांबलं. पाऊसही थांबला. कुठेतरी पाणी खळखळत होतं. कुणी कुणाशी बोलत नव्हतं. एरव्ही सरकारला शिव्या द्यायला उचकणारी वत्तीशी एकदम गप्प होती. साऱ्या वातावरणावर भीतीचा जबरदस्त अंमल होता.

बूढा करीमचाचा आपल्या कोपरापासून तळहातापर्यंतच्या दोन्ही हातांकडे एकटक पाहात विषण्णपणे हसत होता. त्या परिस्थितीत ते हसणं विचकट वाटत होतं. मदनलाल बूढ्या चाचाकडे पाहात होता. करीमचाचा आपल्या हाताकडे पाहात होता. कितीतरी वेळ गेला.

पेंगुळलेले कैदी कधीतरी झोपी गेले.

जागे होते फक्त मदनलाल आणि करीमचाचा ! मदनलालचं लक्ष होतं. करीमचाचानं आपल्या हातांवरची एकटक नजर केव्हाही काढली नव्हती.

रात्रीच्या पावसानंतर सकाळची टवटवीत सृष्टी चैतन्यानं भरलेली होती. बहुतेक कैदी काळरात्रीच्या अनुभवातून बाहेर पडले होते. त्यांचा नित्यक्रम चालू झाला होता. रोजचं तेच काम. तेच गचाळ खाणं. तेच हाल. सगळं काही तेच. ऋतुमानाप्रमाणं हालांचा प्रकार बदलायचा इतकंच. तीव्रता तीच असायची. इथून कैद्यांना पुन्हा घरी जाता येणार नव्हतं. त्याना फक्त मृत्यूच सोडवू शकत होता. मृत्यू येईल असं वाटेपर्यंत हाल होत होते पण मृत्यू येत नव्हता हीच कैद्यांची शोकांतिका होती. इसापूरच्या नरकातून सुटू पाहणाऱ्या कैद्याना गोळ्या घालून यमसदनाची वाट दाखवण्यात येत असे. पर्याय एकच–मृत्यू. मृत्यू येईपर्यंत जिवंत राहाणं किंवा तो लवकर यावा म्हणून स्वत:हून त्याला सामोरं जाणं.










करीमचाचा एका खुनाच्या आरोपावरून इसापूरचा नरकवास गेली कैक वर्षे भोगत होता. तो एकटा बाजूला बसलेला पाहून मदनलाल त्याच्याजवळ गेला आणि म्हणाला, "क्यों करीमचाचा, काल रात्री काय झालं होतं? मला तर वाटलं सगळी दुनिया मातीत मिळणार. नंतर तुम्ही कितीतरी वेळ आपल्या हातांकडे पाहात बसला होतात. मी आख्खी रात्र जागा होतो. अगदी घाबरून गेलो होतो मी. अजिबात झोप लागली नाही . . . त्या लौंडीच्या छातीत सुरा खुपसताना देखील हाताची अजिबात थरथर झाली नव्हती. पण कालचा अनुभव काहीतरी वेगळाच होता. क्या बात क्या है चाचाजी?"

"क्या कहू मदनलाल" आपल्या हातांकडे पाहात काहीतरी आठवल्यासारखे करीत करीमचाचा बोलू लागल्या, "बडी दर्दभरी कहाणी आहे बेटा. दहा वर्षं झाली त्या गोष्टीला. पण सगळं अजून डोळ्यांपुढे स्पष्ट दिसतंय्. बारा वर्षांपूर्वी या तुरुंगात विल्यम नावाचा एक जवान कैदी आला होता आम्ही सगळे विल् म्हणायचो त्याला. लौकरच तो इथे वॉर्डर झाला. काय तब्येत होती यार त्याची. वीस–बावीस वर्षांचा छोकरा. सहाफूट उंच. गोरागोरापान. घारे डोळे होते. जवानीनं नुसता मुसमुसत होता. अँग्लोइंडियन पोरगा. पण बदफैली होता. तीन खून केले होते पठ्ठ्यानं पैशाकरता. अर्थात् त्याचा बोलविता धनी कुणी दुसराच असणार.

विल्यमला आठ नंबरच्या बराकीत ठेवलं होतं. पण तो वॉर्डर झाल्यापासून सबंध तुरुंगभर हिंडायचा. आम्हा सगळ्या कैद्यांना त्याचा दरारा वाटायचा. तो होताच तसा दादा. कधी कुणी कैद्यानं ज्यादापणा केला तर एक थोतरीत चढवून द्यायचा. बिचाऱ्या कैद्याला पाणी पाजायची वेळ आणायचा पण पाणीच नसायचं.

विल्यम ज्यावेळी इथे आला त्यावेळी सॅमसन म्हणून जेलर होता. सॅमसन भलताच क्रूर होता. दिसायला धिप्पाड आणि ओबडधोबड. पण विल् त्याच्या तोडीस तोड होता. इंग्रजीही फाडफाड बोलायचा. सॅमसनही विल्ला मानायचा.

त्या सॅमसनला एक जवान छोकरी होती, मारिया. एकदम खुबसूरत . . . जेलरचीच लडकी ती. सगळ्या तुरुंगात हिंडायची. पण तिच्याकडे डोळा वर करून पाहायची कुणाची हिंमत नव्हती. सॅमसनच्या घरात एवढी सुंदर छोकरी कशी काय पैदा झाली याचा आम्ही कैदी लोक अचंबा करीत असू.

एक दिवस त्या छोकरीचं आमच्या लीडरकडे–विल्कडे – लक्ष गेलं. विल्नंही तिच्याकडे पाहिलं. त्यांची नजरानजर झाली अन् बस् मी बूढा अनुभवी माणूस काय ते समजलो. अरे फत्तरात पण इष्काची फुलं फुलतात. मारिया तुरुंगात वारंवार फिरायला आणि विल्ला भेटायला लागली. कितीतरी वेळ ती दोघं एकमेकांशी बोलत बसायची. मारिया विल्साठी चॉकोलेट्स घेऊन यायची. तो तिला कैदखान्याच्या आवारात वाढणारी पिवळी रानटी फुलं द्यायचा.

विल्चा शिपायांवरही वचक होता. ते सगळं निमूटपणे पाहात पण जेलरच्या कानावर या गोष्टी घालण्याची त्यांची काय ताकद होती? तीन खून करणाऱ्या विल्ला आणखी एखादा खून हत्याराशिवाय करणं अवघड नव्हतं. जेलर जरी इंग्लिश होता तरी शिपाई देशीच. बुझदिल कुठले.

एकदा मारिया विल्ला म्हणाली : मी तुला इथून सुटण्याचा मार्ग दाखवते. तू पळून जा. मग आपण परदेशात जाऊन शादी करू. आमचा विल् बडा उमदा. तो तिला म्हणाला, नाही. तू माझ्यावर प्यार करतेस. तुझ्या प्रेमाचा मी असा गैरफायदा घेणार नाही. कधीकाळी सुटका झालीच तर. . .

एक संध्याकाळी विल् आणि मारिया बराकीच्या मागच्या बाजूला बोलत बसली होती. थोडा अंधार पडला होता. इतक्यात जेलरसाहेब बराकीला भेट द्यायला आले. ही गोष्ट मी विल्ला खुणा करून, बोलून सांगण्याची कोशिश केली. पण तो एकदम मश्गूल होऊन गेला होता. जेलरसाहेबानी जेव्हा त्याच्या बाजूने बॅटरी मारली तेव्हा मारिया विल्च्या मिठीत विसावली होती. आपली लडकी एका मामुली कैद्याच्या मिठीत पाहून सॅमसनसाहेब संतापून गेले. ओरडून त्यानी मारियाला घरी जाण्याबद्दल सांगितलं. आणि स्वतःही तिच्या पाठोपाठ दाणदाण पावलं टाकीत निघून गेले . . . त्यानंतर मारिया पुन्हा तुरुंगात दिसली नाही. सॅमसनसाहेबानं तिला तुरुंगात फिरण्याची सक्त मनाई केली.





अनुक्रमणिका

आपली लडकी आणि विल्यम यांचं एकमेकांवर प्यार आहे ही गोष्ट सॅमसन-साहेबाच्या ध्यानात आली.

एक दिवस सॅमसनसाहेबानं मला त्याच्या कचेरीत बोलावून घेतलं. मला त्यानं बसायला सांगितलं आणि पुढे ग्लासभर अस्सल विलायती शराब ठेवली. म्हणाला, करीम माझं एक काम आहे. केलंस तर या जहन्नममधून तुझी सुटका करीन ... जेलरसाहेबाचा तो प्लान ऐकून मी दंग होऊन गेलो. त्याला विल्यमला ठार करायचं होतं. त्याच्या लडकीवर प्यार केल्या-बद्दल विल्यमला त्याला शिक्षा करायची होती. कायमची. ... दोन फूट रुंदीचा, आठ फूट खोलीचा, सहा साडेसहा फूट लांबीचा एक खड्डा खणायचा. रुंदीच्या बाजूने विल्यम उभा असताना जेलरनं त्याला आत खड्ड्यात ढकलायचं आणि बाजूला फावडं हातात घेऊन, मी लगेच वरून त्याच्या अंगावर माती आणि दगड ढकलायचे आणि त्याला पुरून टाकायचं असा तो प्लान होता. ( करीमचाचानं इथे सॅमसनसाहेबाच्या नावानं एक अर्वाच्य शिवी हासडली. ) खूप दिवसानी चांगली शराब भरपूर प्यायला मिळाल्यामुळे आणि आपली सुटका होणार म्हणून आनंद झाल्यामुळे मी आमच्या लीडरला ठार करण्याच्या कामी जेलरला मदत कर-ण्याचं मान्य केलं.

काहीतरी कारण सांगून सॅमसनसाहे-बानं खड्डा तयार करवून घेण्याचं काम विल्कडेच सोपवलं. आम्ही कैदी खड्डा खणीत होतो. विल् बेचारा स्वतःसाठी खणल्या जाणाऱ्या खड्ड्याच्या कामावर देखरेख करीत होता. कमनशिबी होता. मी आतून घाबरून गेलो होतो. त्या दिवशी विल्नं मला खोदून खोदून विचारलं. तुला सॅमसनसाहेबानं कशासाठी बोलावलं होतं ? तिथे तुला मारिया दिसली का? कशी होती ती ? ... मदनलाल, मी काही बोललो नाही. एकटा जेव्हा बाजूला गेलो तेव्हा हमसून रडलो. फार फार रडलो. स्वतः-शीच.

साधारण अंधार पडायच्या संध्याकाळी सॅमसनसाहेब आला. विल् खड्ड्याच्या रुंदीच्या भागावर उभा राहून बोलत होता. खड्ड्यातून खणून काढलेली माती आणि दगड बाजूलाच पडले होते. मी तिथेच होतो. धकधक चालू होती. बोलता बोलता सॅमसनसाहेब फिरला. ... दुसऱ्या क्षणी विल् त्या खोल खड्ड्यात उताणा पडला. मी वरून दगड आणि माती टाकायला सुरुवात केली. त्याला हालचाल करता येणं मुश्किल होतं. जिवाच्या आकांतानं त्यानं किंकाळी फोडली. " साथियों ऽऽऽ ! रुक् जाऽऽऽ व. ये धोखा है." दगड माती ढकलणारे हात ती दर्दभरी किंकाळी ऐकून जियल्या-तिथे रुकले. माझ्या कृत्याचा मला पश्चा-त्ताप वाटू लागला. मी बेवफाई करतो आहे याची जाणीव होऊन माझे हात थांबले... पण पुढच्याच क्षणी वाटलं, जर विल् खड्ड्याच्या बाहेर आला ... तर आपली खैर नाही. या विचारासरशी हातात कुठली तरी विजेरी शक्ती येऊन ते भराभर दगड आणि माती, खड्ड्यात लोटू लागले. ... खड्डा पूर्ण भरला. सॅमसनसाहेब समाधानाच्या कैफात निघून गेला. मी त्या खड्ड्याच्या जागेकडे आणि हातांकडे आळी-पाळीनं पाहात सुन्नपणे बघत बसलो. खड्ड्यातून बाहेर आलेला विल् आपल्या कणखर पंज्यानं आपली मान आवळतो आहे असं मला सारखं वाटायला लागलं.

... नंतरच्या २–४ दिवसानी आलेल्या अमावास्येच्या रात्री बाराच्या सुमारास आठ नंबरच्या बराकीची दारं गदगदायला लागली. विल्यमची जिवाच्या आकांतानं मारलेली किंकाळी मला आणि सगळ्यानाच ऐकू आली, " रुक् जाऽऽव. ये धोखा है. साथियों, तुमने मुझे धोखा दिया है. मैं तुम्हें कभी माफ नहीं करूंगा." आवाजाची तीव्रता वाढत गेली. मी घाबरून गेलो. दरदरून घाम फुटला मला. आठ नंबरच्या बराकीतले कैदी घाबरले. नंतर त्याना दुसऱ्या बराकींमधून हलविण्यात आलं.

दर अमावास्या आणि पौर्णिमेला रिकाम्या असलेल्या आठ नंबरच्या बराकी-तून असेच भीषण आवाज येतात आणि भोवतालची सारी सृष्टि थरारून उठते.

विल्यम गेला. सॅमसनसाहेब दगाबाज निकला. माझी सुटका झाली नाही. नंतर तो विलायतेला निघून गेला.

माझी सुटका त्याच दिवशी होईल, की ज्या दिवशी विल्यम येऊन मला ठार करेल. त्याच दिवशी त्याच्या आत्म्याला शांती लाभेल ... आणि माझ्याही."

करीमचाचा आपल्या हातांकडे पाहू लागला.

• • •

# परशुरामाची सांवली

' दीपावली ' ने आपल्या रजत महोत्सवी वर्षात पदार्पण केल्याच्या निमित्ताने कादंबरी–स्पर्धा जाहीर केली होती, त्यातील पहिल्या पारितोषिकाची **' प्रतीक्षा '** कादंबरी दिवाळी अंकात प्रसिद्ध झाली आहेच. ती कादंबरी आवडल्याची असंख्य वाचकांची पत्रे आमच्याकडे येत आहेत. याच स्पर्धेतील दुसऱ्या क्रमांकाची कादंबरी ' परशुरामाची सावली ' ही **श्री. रवींद्र पिंगे** यांच्या ढंगदार लेखणीतून उतरलेली असून ती ' दीपावली ' च्या जानेवारी १९६९ च्या अंकापासून क्रमशः प्रसिद्ध होत आहे. वाचकानी आली प्रत आगाऊ राखून ठेवावी.

**—संपादक**






पलंग हा माणसाचा रोजचा सोबती .... त्याच्या अद्भुत इतिहासाचा हा उत्तरार्ध. (पूर्वार्ध 'दिवाळी १९६८' अंकात प्रसिद्ध झालेला आहे)

राजाराम हुमणे



एका संस्थानिकाचा अखंड चांदीचा एक टनी वजनाचा पलंग




# पलंगापासून पलंगापर्यंत

## एक रोमहर्षक प्रवास

एका पलंगावर दोन किंवा अधिक माणसानी झोपावे की नाही ? ज्याअर्थी देशोदेशी जोड किंवा दुहेरी पलंग अस्तित्वात आहेत त्याअर्थी दोघानी एका पलंगावर झोपण्याची प्रथा सर्वमान्य आहे असे मानायला हरकत नाही. दोन पलंग प्रथम एकत्र जोडले ते ग्रीक आणि रोमन लोकानी. हा जोड पलंग अर्थात् जोडप्यासाठीच होता हे ओघाने आलेच. ( पती पत्नीला एकत्र आणणारा जोड-पलंग तयार करून या लोकानी पुण्यकर्म केले की पाप हे वैवाहिक जीवनाचा दीर्घकाळ अनुभव घेतलेल्यानीच ठरवावे.) वैवाहिक जीवनाचा पहिला उन्माद गेल्यावर या जोड पलंगावर ते जोडपे पाठीला पाठ करून कसे झोपते हे पाह्यचे असेल तर आपल्याला लग्न करूनच पाहिले पाहिजे. नवपरिणीत दांपत्याची सोय हा जोडपलंग निश्चित पहातो. परंतु 'दोन देहात एक हृदय' असलेल्या या जोडप्यातील कुणीतरी एक घनघोर घोरणारे असेल तर हा जोडपलंग म्हणजे एक शापच आहे असे दुसऱ्याला वाटले तर नवल नाही.

पतीपत्नींनी एकत्र शयन करावे हे नैसर्गिक आहे. परंतु संत आणि महात्मे सुखासाठी नव्हे तर 'आत्यंतिक दुःखा'चा अनुभव घेण्यासाठी, आत्मपीडनासाठी, सुंदर स्त्रियांबरोबर शय्यासोबत करीत असल्याचे अनेक दाखले रेनॉल्डस्ने ख्रिश्चन संतांबाबत सांगितले आहेत. माल्मेस ल्युरीचा सेंट अल्डेम तर याच्यापुढे जाऊन दोन बाजूला दोन तरुण मुली घेऊन झोपत असे म्हणे. हे संतमहात्मे आपल्या संयम शक्तीची, मनदमनाच्या मनोधैर्याची परीक्षा घेण्यासाठी आणि मोहावर मात करण्यासाठी हा जुलमाचा रामराम करीत. आपण असे वागलो म्हणजे लोक आपली निंदा करतील आणि ही लोकनिंदा सहन करण्याचे सामर्थ्य आपल्यामध्ये आले तर 'स्वर्गाचे द्वार' ( असे नाही तर तसे – किंवा असे आणि तसेही ) आपल्यासमोर उघडले जाईल अशीही त्यांची समजूत होती.

ग्रीस, इटाली, फरान्स इत्यादि देशात पतिपत्नींनी एका पर्यंकावर झोपण्याची प्रथा सर्रास रूढ आहे. याच्या उलट इंग्लंडमध्ये एका पलंगावर पतीपत्नींने झोपणे ( म्हणजे रात्रभर) अनैसर्गिक, अशिष्ट आणि मूर्खपणाचे मानले जाते. इंग्लंडमध्ये तर प्रत्येक माणसाला त्याचा वेगळा पलंग असतो. पाहुण्यासाठी एखादा पलंग मुद्दाम राखून ठेवण्यात येतो. घरात पाहुणा आला आणि त्याच्यासाठी रिकामा पलंग नसला तर इंग्लिश माणूस त्याची 'औपचारिक' माफी मागून त्याला सरळ बाहेरचा रस्ता किंवा हॉटेल दाखवितो. इंग्लंडमध्ये 'प्रत्येकाला पलंग' परवडत असेल.

परंतु जपान, हिंदुस्थानसारख्या देशात हे कसे परवडणार ? एका खोलीत दहा दहा माणसे दाटी-दाटीने झोपत असल्याचे दृश्य म्हणूनच आपल्याला अनोखे वाटत नाही. एस्किमोतही असे एकत्र झोपण्याची प्रथा आहे. पैशाची किंवा हवेची ऊब नसल्यावर असे हे व्हायचेच !

**झोपावे कसे !**

आता प्रश्न उरतो तो माणसाने कसे झोपावे? कपडे घालून की कपडे काढून? मध्ययुगात पाश्चिमात्य देशात बिछान्यात नग्न झोपण्याची प्रथा सर्रास रूढ होती. इतकी की १४ व्या शतकात शर्ट आणि पायजमा घालून झोपायला आलेल्या एका पुरुषाची त्याच्या स्त्रीनेच 'बावळट' आणि ' मूर्ख ' माणूस म्हणून कुचेष्टा केली. परंतु १६ व्या शतकापासून इंग्लंड आणि इतर देशात लोक अंगावर कपडे घालून झोपू लागले आणि मग ' रात्रीच्या कपडयांच्या ' अनेक फॅशन्स देशोदेशी निघू लागल्या. पुरुषाला 'झेब्रा' बनविणारा चट्टयापट्टयाचा पायजमा आणि शर्ट मात्र १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात आला. आपल्या देशातील जुन्या वाङमयात उत्तररात्रीच्या शृंगार वर्णनातही 'उत्तरीया'चा उल्लेख आढळतो. त्यावरून आपल्याकडे ( कारणाशिवाय ) नग्न झोपण्याची प्रथा नसावी.

सैन्यात सैनिकाचा गणवेश सतत त्याच्या अंगावर असतो की नाही हे फार कटाक्षाने पाहिले जाते. एकदा एका सैनिकाला गणिकेकडे जाण्याची लहर आली. आणि तिच्या शय्यागारात गेल्यावर गणवेश उतरल्याशिवाय दुसरा तरणोपाय राहिला नाही. त्याच अवघड स्थितीत त्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यानी त्याला पकडले. त्याच्यावर खटला भरण्यात आला. तो गणिकेकडे गेला म्हणून नव्हे तर त्याच्या अंगावर त्याचा गणवेश नव्हता म्हणून ! आपल्या बचावाचं भाषण करताना त्या सैनिकाने सांगितले, " न्यायाधीश महाराज, मी गणवेश घातला नव्हता हा आरोप खोटा आहे. मी हाती घेतलेल्या कामगिरीला योग्य असाच गणवेश त्यावेळी परिधान केला होता." साधूंप्रमाणेच वातावरण हेच आपले वस्त्रप्रावरण मानणारे असेही काही दिगंबरपंथी लोक असतात.

प्रणयाप्रमाणे प्रसूती हीही पलंगाशी निगडित असलेली मानवी जीवनातील एक गूढ घटना होय. प्रसूति वेदनांच्या मरणप्राय दुःखाची तमा न बाळगता पुत्रप्राप्तीसाठी नवससायास, अंगारेधुपारे करणारी स्त्री सर्वांना परिचित आहे. परंतु अपत्य संभव म्हणजे प्रचंड शक्तिपात मानणाऱ्या स्त्रियाही ऑस्ट्रेलियातील क्वीन्सलॅंडमध्ये आढळतात. गेलेली शक्ती पुन्हा मिळविण्यासाठी वाघिणीप्रमाणे स्वतःचेच मूल स्वतः खाणाऱ्या स्त्रियाही या जगात आहेत. प्रसववेदनांच्या असह्य यातना आणि कधी कधी प्रसूतीची मृत्यूत होणारी परिणती यामुळे प्रसूतिविषयीही अनेक लोकभ्रम आहेत. त्यामुळेच आपल्याकडे पाचवी, सटवाई, जोगाई इत्यादि देवदेवताना बायाबापड्या मानत आल्या आहेत.

**बाप बाळंतीण बनतो**

प्रसूतीचा आणि पुरुषाचा वास्तविक कारणापुरता ' संबंध ' परंतु प्रसूति कालात पुरुषाने गर्भवतीप्रमाणे पलंगावर पडून राहण्याची प्रथा जशी आदिमानवात होती तशीच पश्चिम युरोपातील सुसंस्कृत देशात अद्यापही प्रचलित आहे. हा पुरुष नुसता पलंगावर पडून रहात नाही तर स्त्रीचे कपडेही करतो. गर्भवतीप्रमाणे जडपणे बोलतो, चालतो आणि पोटात कळा आल्याचे नाटकही करतो. गर्भवती स्त्रीप्रमाणे अपत्य जन्मापूर्वी काही काळ किंवा तब्बल नऊ महिने त्याला शस्त्रे वापरण्याची, जड उचलण्याची किंवा जड काम करण्याची बंदी असते आणि जेव्हा मुलाचा जन्म होतो तेव्हा आईच्याऐवजी बापालाच मूल कुशीत घेऊन पलंगावर झोपून रहावे लागते. नातेवाईक आईच्या ऐवजी बापाच्या तोंडात साखर घालून त्याचे कोडकौतुक करतात. मार्कोपोलोने झारदनदन प्रांतातील या 'गर्भार बापा'ची कथा सांगताना पुत्रजन्मानंतर बाळंतीण नित्याचे काम करायला मोकळी होते आणि मुलाला वाढविण्याचे काम बापाला महिना दीड महिना तरी करावे लागते असे सांगितले आहे.

या बापाला कराव्या लागणाऱ्या 'बाळंतपणा'ला फ्रेंच, जर्मन, इंग्रजी भाषेत खास शब्द आहेत. निरनिराळ्या प्रवाशानी चीन, हिंदुस्थान, बोर्निओ, सयाम, युरोप आणि दक्षिण व उत्तर अमेरिकेत ती प्रथा असल्याचे लिहून ठेवले आहे. आफ्रिकेत ही प्रथा अभावानेच असली तरी सुदान आणि कांगोमध्ये काही ठिकाणी ती अस्तित्वात असल्याचे दिसून आले आहे. खुद्द इंग्लंडमधील पूर्व अँग्लिया भागात लोकांची अशी समजूत होती की स्त्रीच्या गर्भारपणाचा पुरुषावर अप्रत्यक्ष परिणाम होतो. त्यामुळे पुरुषाला मळमळायला लागलं की भावी अपत्य संभवाबद्दल त्याला इतर मंडळी चिडवायला लागत. या प्रथेची जी अनेक कारणे सांगण्यात येतात त्यातील महत्वाचे कारण म्हणजे पित्याचा मुलावरील हक्क प्रस्थापित करण्याची पूर्वतयारी. मातृसत्ताक कुटुंबपद्धतीचे पितृसत्ताक



**शूमन सर्कशीतील मुस्ताफा घोड्याला झोपण्यासाठी खास पलंग**

कुटुंबपद्धतीत रूपांतर व्हावयास या वाप्याच्या वाळंतपणाने हातभार लावला असे काही जणांचे म्हणणे आहे. पुरुष हा स्त्रीपेक्षा अधिक सामर्थ्यशाली असल्याने मुलांवर येणारी दैवी संकटे घालविण्यासाठी किंवा ' इडापिडा ' टाळण्यासाठी मुलांचे संगोपन करण्याचे कार्य अशा रीतीने त्याच्याकडे सोपविण्यात येत असावे असे दुसऱ्या काही जणांचे मत. पुरुषाच्या स्तनातून दुग्धोद्भव होतो अशी समजूतही या प्रथेच्या मुळाशी असावी. स्त्रीप्रमाणे विशाल वक्षस्थल असलेले आणि क्वचित् प्रसंगी दूध देणारे पुरुषही आढळले तरी हे कारण आता अशास्त्रीय मानले जाते.

पाळणा म्हणजे पोरांचा पलंगच. पाळण्यानेही पलंगाप्रमाणे अनेक स्थित्यंतरे पाहिली आहेत. झाडाच्या ढोलीपासून चंदनाच्या पाळण्यापर्यंत. मध्यंतरी झाडाच्या फांद्याना बांधलेल्या कापडाच्या झोळघा, गळचात कांगारुप्रमाणे मुलाला बाळगणारा खोळ येऊन गेले. चार पायावर झुलणारा आणि वर चिमण्या-मोर बसविलेला पाळणा जसा होता तसाच आढ्याला टांगलेला झूलाही होता. पलंगाप्रमाणे पाळण्यानेही खूप वैभव पाहिले. चांदी, सोने, हस्तिदंत, मखमल, जरतार सारे काही. राजघराण्यात तर पलंगाइतकाच पाळण्यावर खर्च होऊ लागला.

## पलंग पुरुषांची उदाहरणे

पलंग म्हटला की माणसाला दिसतो प्रणयी युगुलाचा शृंगार. परंतु कामक्रीडेपेक्षा इतरही अनेक कामे पलंगावर करणारी मंडळी आहेत. " असेल माझा हरी तर देईल खाटल्यावरी " असा भगवंतावर भरवसा ठेवून देहाचा भार पलंगाच्या अंगावर टाकणारे आळशी गंगारामही या जगात फार आहेत. सामान्य माणसाप्रमाणे एकतृतीयांशच नव्हे तर आपले उभे आयुष्य पलंगावर आडवे पडून घालविणारे हे महाभाग. चोवीस तास पलंगावर पडून राहिलेला, आपले जेवणखाण पलंगावरच करणारा आणि क्वचितच जमिनीवर उभा रहाणारा एक माणूस खुद्द आपल्या महाराष्ट्रात – अहमदनगरमध्ये आहे. याला आता कशाचा तरी आधार घेतल्याशिवाय उभेच रहाता येत नाही. घरची माणसे बाहेर गेली तर त्याच्या खाण्याची पंचाईत होऊ नये म्हणून त्याला पलंगावर पडल्या पडल्या त्याच्या हाताला लागेल असे शिकाळे बांधून ठेवतात. या माणसाला काही व्याधी वगैरे झाली असेल असा जर तुमचा समज असेल तर तो साफ चुकीचा आहे. हा धट्टाकट्टा माणूस केवळ पलंगाशी अतिसंग केल्यामुळे लुळापांगळा झाला आहे. सुप्रसिद्ध कादंबरीकार इव्हॉन गॉनचेराव्ह यानी आपल्या एका कादंबरीत असाच पलंगावर पडून रहाणारा ' ऑबलोमोव्ह ' नावाचा पलंग-पुरुष चित्रित केला आहे. या पात्राने इंग्रजी भाषेला " पलंग प्रेम " व्यक्त करणारा ' ऑबलो मोव्हिटिस् ' ( oblomovitis ) हा शब्द दिला.

जगातील काही श्रेष्ठ व्यक्तींनाही पलंगाचा संग प्रिय वाटला. ॲडिसन, रूसो, व्हॉल्टेर, स्वीफ्ट, मार्कट्वेन, चर्चिल इत्यादि थोर लेखक आपले बरेचसे लिखाण पलंगावर करीत. चर्चिलने तर दुसऱ्या महायुद्धाच्या इतिहासाचा बराचसा भाग पलंगावरूनच आपल्या लेखनिकाला सांगितला. मिल्टनचे ' पॅरॅडाइज लॉस्ट ' हे महाकाव्य पलंगावरच जन्माला आले. थॉमस हॉब्झने अंकगणिताची बरीचशी प्रमेये पलंगावरच रचली. अंकगणिताचे आकडे तो स्वतःच्या अंकावर नाहीतर पलंगपोसावर मोडीत असे. पेझेलो, रोझिनी, डॉनिझेट्टी, ग्लिन्का, पुसिनी इत्यादि संगीतकारानीही आपल्या संगीतिका पलंगावरच बांधल्या. रोझिनीला तर पलंग सोडणे अगदी जिवावर येई. त्याची अशी एक कथा सांगतात की संगीतिकेचा त्याने रचलेला एक भाग पलंगावरून खाली पडला. उठून तो कागद उचलण्याचे त्याच्या जिवावर आले आणि मग त्याने त्याच्या ऐवजी दुसरा नवा भाग लिहिला. अनेक चित्रकारही रेखाटन करण्यासाठी पलंगाचा उपयोग करीत. जी. के. चेस्टरटन हाही पलंगाचा पाठीराखा आणि वामकुक्षीचा पुरस्कर्ता होता. इटाली, स्पेन, ग्रीस, इत्यादि देशात वामकुक्षीची प्रथा इतकी प्रचलित आहे की तेथील कार्यालये दुपारपासून चार वाजेपर्यंत बंद असतात. ( आपल्याकडे कारकून मंडळी कार्यालय चालू असतानाही साहेबाचा डोळा चुकवून चक्क वामकुक्षी घेतात — साहेबाच्याही कधी हे डोळचावर येत नाही कारण त्याचाही नेमका त्याच वेळेला डोळा लागतो. ) इंग्लंडमध्ये मात्र वामकुक्षी घेणे ' अपौरुषेय ' मानले जाते. तरीही काही 'पुरुषासारखे पुरुष ' वामकुक्षी घेण्याचे धाडस करतात. कार्यालयात कर्मचारी सोडल्यास इतरेजनाना आपल्याकडे धकाधकीच्या जीवन कलहामुळे रविवारखेरीज वामकुक्षी घेणे अशक्यप्राय होऊन बसले आहे.

माणसाप्रमाणेच पलंगावर प्रेम करणारे इतरही काही प्राणी आहेत. ते म्हणजे ढेकूण, डास, पिसवा, चिलटे, झुरळे आणि उंदीर. पलंगावर प्रेम करणाऱ्या माणसाचा ते म्हणूनच फार दुस्वास करतात. त्यांचा डोळ्याला डोळा लागू देत नाहीत. त्याना ' सळो की पळो' करून सोडतात.

पलंगावर दिवसभर लोळणारी किंवा सूर्य कासराभर आला तरी झोपून रहाणारी 'सूर्यवंशी माणसे' पुष्कळ आहेत. परंतु वर्षानुवर्षे 'पर्यंकस्थ' राहिलेल्या माणसांच्या ' अद्भुत आणि चमत्कारिक '












मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





गोष्टीही पुष्कळ आहेत. ॲबिव्हिले गावात १९२८ साली पलंगावर पडलेला राडल दुव्हल नावाचा एक गृहस्थ सतत १८ वर्षे पलंगावरच पडून होता. 'या दुष्ट जगाशी कसलाही संबंध नको – त्याचा विचार सुद्धा करायला नको' म्हणून पलंगावर निवृत्त झालेल्या या माणसाचा निश्चय फक्त १९४० मध्ये गावावर बॉम्बवर्षाव झाला तेव्हा थोडासा ढळला तेवढाच. गॅलिसियामधील एक स्पॅनिश डॉक्टरही असाच स्वेच्छेने १८७५ मध्ये बिछान्यात घुसला तो १६ वर्षे तियून हलला नाही. बिछान्यावर आडव्या पडलेल्या रोग्याना तपासण्याचा वीट आल्यामुळे त्याने स्वतःच बिछान्यावर आडवे होण्याचे ठरविले. या काळात तो फक्त आपल्याकडे उभ्या उभ्या का होईना पण स्वतःच्या पायाने चालत येऊ शकणाऱ्या आजारी माणसाना तपासण्याचे काम करी.

## पलंगावरून न्यायदान

न्यायदेवता आंधळी असते असे म्हणतात. परंतु पलंगावरून न्यायदान करण्याची प्रथा सुरू करून आपल्या पूर्वजानी ती 'निद्रिस्त'ही असते हे दाखवून दिले. पूर्वी राजेमहाराजे, हुकुमशहा, किंवा धर्मोपदेशक पलंगावरून न्यायदान, राज्यकारभार किंवा उपदेश करीत. अर्थात त्यांचा हा पलंग नित्याचा निजायचा पलंग नसे. ते असे सिहासनच, पण पलंगासारखे ऐसपैस. त्यावर आडवे ओठंगून राजेमहाराजे प्रजाजनाना न्याय देत किंवा राजाज्ञा करीत. ग्रीसमध्ये तिसऱ्या शतकात शिकंदर आपल्या तंबूत सोन्याच्या पलंगावर आडवा होऊन आपल्या सभोवतीच्या उभ्या राहिलेल्या सैनिकाना युद्धाचे हुकूम फर्मावीत असे. रोमन राजे आणि शासकीय अधिकारी असेच 'आडवे होऊन' प्रजाजनांची गाऱ्हाणी ऐकत. मध्य युगानंतर फरान्समध्ये तर सिंहासनापेक्षा पलंग हेच राजाचे खरे आसन मानले जाऊ लागले. १४ व्या शतकात तर फरान्सचा राजा उभ्या पार्लमेंटमध्ये त्याच्यासाठी ठेवलेल्या खास पलंगावर चक्क आडवा होऊ लागला.

नंतर राजांची ही 'गादी' पश्चिम युरोपातील अनेक प्रतिष्ठीत मंडळी चालवू लागली. 'ताठ' न बसता 'ताठरपणा' दाखविण्याचा हा 'राज'मार्ग अनेकजण आचरू लागले. आपल्याला भेटायला येणाऱ्या लोकांपुढे 'ताठ' बसणे म्हणजे पाठीला कणा नसल्याचे—कमीपणाचे – लक्षण मानले जाऊ लागले. लब्धप्रतिष्ठीत मंडळी, विशेषतः मिजासखोर बायका घरात मर्तिक झाल्यावर किंवा लग्नसमारंभातही 'आडव्या-आडव्याने'च आल्यागेल्यांचा समाचार घेऊ लागल्या. १८ व्या शतकात तर सजविलेल्या शय्यागारात भरजरी कपडे आणि विविध अलंकार घालून पलंगावर पडल्या पडल्या अनेक समारंभ पार पाडण्याची फॅशनच स्त्रियांमध्ये बोकाळली. ती इतकी की, काही ठिकाणी तिला कायद्याने बंदी घालावी लागली. आपल्या गर्भाधान समारंभाशिवाय पलंगाचा असा वापर क्वचितच केला जातो. बाळंतीणीला बिचारीला नाइलाजास्तव पडल्या पडल्या भेटायला येणाऱ्यांशी बोलावे लागते.

मनुष्य एकदाच जन्मतो—आणि एकदाच मरतो. अमर्याद शृंगार हाही मर्यादित कालखंडापुरता मर्यादित असतो. परंतु रोज रात्री निद्रेची आराधना करण्यासाठी आपल्याला पलंगापुढे (म्हणजे पलंगावर) साष्टांग नमस्कार घालावा लागतो. प्रत्येक प्राण्याला अन्नाप्रमाणेच निद्रा आवश्यक असते. हत्ती आणि मासे झोपत नाहीत असे म्हणतात. परंतु ते खरे नव्हे. हत्तीला तासा-दोन तासाची झोप पुरी होते. तर माशाला जाता-येता चार डुलक्या घेतल्या तरी त्याचे काम भागते. याच्या उलट मगरी, कासवे इत्यादि प्राणी आयुष्यातील बराच काळ झोपण्यात घालवितात. शीत कटिबंधातील स्तन्य आणि सरपटणारे प्राणी तर महिनेच्या महिने सुस्तपणे पडून रहातात. माणसाला झोप नसेल तर वेड्यासारखे होते. मग डुलकी येते. डोळ्यावर झापड येते. मनाविरुद्ध डोळे आपोआप मिटतात. अतिश्रमानंतर नाहीतर अतिजागरणानंतर तर माणसाचा आपल्या शरीरावरील आणि मेंदूवरील ताबाच नष्ट होतो. म्हणूनच अशी माणसं आंघोळ करता करता बुडून मेल्याची किंवा शेक घेता घेता जळून मेल्याची उदाहरणे आढळतात. मोटार चालविताना झोपी जाणारी व कायमची झोपणारी माणसेही काही कमी नाहीत.

निद्रानाश हा माणसाचा तसाच पलंगाचा वैरी. ही 'वैऱ्याची रात्र' निर्माण होते दुःख, चिंता, भीती, महत्त्वाकांक्षा यातून. आपल्या सुखदुःखावर साऱ्या जगाचं जणू काही सुखदुःख अवलंबून आहे असे समजणारी आत्मनिष्ठ माणसं निद्रानाशाला बळी पडतात. या भूतलावर दोन अब्जाहून अधिक वर्षे प्राणीजीवन अस्तित्वात आहे; परंतु मनुष्य प्राणी १०० वर्षांहून अधिक काळ सहसा जगत नाही. अशा स्थितीत आपल्या सुखदुःखाचा बाऊ करण्यात आणि निद्रानाशाला आमंत्रण देण्यात काय हंशील आहे? कविवर्य तांब्याप्रमाणे "जन पळभर म्हणतील 'हाय हाय'— मी जाता राहील कार्य काय" असाच प्रत्येकाने विचार केला पाहिजे. मानवाने पलंग निर्माण केला तो निवांतपणे निद्रा घेण्यासाठी— अस्वस्थ होऊन या कुशीवरून त्या कुशीवर तळमळत पडण्यासाठी नव्हे.

## निद्रानाशासारखा अतिनिद्रा हा रोगच

माणसाला निद्रानाशाप्रमाणे अतिनिद्रेचाही रोग जडू शकतो. अशी माणसं जिवंतपणी मृत मानून जाळली किंवा पुरली गेली आहेत. 'कुंभकर्णा' चे असले काही वंशज सतत १५ दिवस मृतवत् गाढ झोपी गेल्याची उदाहरणे आहेत. यातील एक वंशज तर सतत १४ आठवडे निद्रिस्त होता म्हणे. दीर्घ निद्रेचे सर्वात मोठे उदाहरण म्हणजे एका स्वीडीश मुलीचे. वयाच्या १४ व्या वर्षी ती जी झोपली ती ३२ वर्षांनी जागी झाली. तिच्या या निद्रेमागे ऋतु संभवाची जबरदस्त मानसिक

## आम्ही दिलगीर आहो

'दीपावली' चा दिवाळी विशेषांक दरवर्षीप्रमाणे यंदाही वर्गणीदाराना दिवाळीतच मिळावा अशा बेताने म्हणजे दि. १६ ऑक्टोबरलाच रजिस्टर पोस्टाने येथून रवाना करण्यात आला होता, पण पोस्टातील कर्मचाऱ्यांच्या 'धीरे काम' धोरणामुळे असेल, कित्येकाना तो ऐन दिवाळीत न मिळता नंतर काही दिवसानी मिळाला. या प्रकारामुळे वाचकांचा अत्यंत विरस झाला. आमचा इलाज नसलेल्या या घटनेबद्दल आम्हाला दुःख वाटते. कसलाही गैरसमज होऊनये म्हणून हा खुलासा.

—संपादक

भीती असावी असे शास्त्रज्ञ सांगतात. नाहीतर ऋतु येण्याच्या काळात तिला निद्रा आली नसती आणि ऋतु जाण्याच्या काळात नेमकी ती जागी झाली नसती. कारण ४६ व्या वर्षानंतर ती बरीच वर्षे सर्वसामान्य माणसासारखी जगली.

मानवी जीवनाला व्यापून टाकणाऱ्या नाना रसांचा राजा म्हणजे शृंगार. इतर राजांप्रमाणे या राजालाही पलंग प्रिय वाटला तर नवल नाही. आदिमानवाचा अडाणी, रांगडा, घसमुसळा शृंगार असो नाहीतर प्रगत मानवाचा प्रणयाराधनपूर्व शृंगार असो त्याची परिणती अंती पलंगावरच होणार. शरीरमीलन ही स्त्री-पुरुष संबंधाची अंतिम परिसीमा. दीर्घायुष्य लाभल्यामुळे पलंगाचा दीर्घ सहवास लाभलेली माणसे जशी या जगात आहेत, तसेच प्रणयासाठी पलंगाचा प्रदीर्घ काळ उपयोग करणारे भाग्यवान पुरुषही या जगात होऊन गेले आहेत. हॅंपशायर परगण्यात अल्डेरब्युरी गावात रहाणारा थॉमस पार नावाचा 'पुरुषोत्तम' १४८३ ते १६३५ म्हणजे १५२ वर्षे जगला. वयाच्या १२० व्या वर्षी त्याने दुसरे लग्न केले. त्याची दुसरी बायको ५२ वर्षांची तरुण विधवा होती. असे सांगतात या विवाहामुळे तिच्यावर पश्चात्ताप करण्याची पाळी आली नाही. या बिजवराबद्दल तक्रार करायला तिला काहीच जागा नव्हती कारण तिच्या दृष्टीने तो 'म्हातारा इतुकान' इतका तरुण होता. नॉर्वेमध्ये जोसेफ सरिंग्टन नावाचा असाच एक गृहस्थ १७९७-मध्ये वयाच्या १६० व्या वर्षी मरण पावला. त्याच्या मागे त्याची तरुण पत्नी ( अर्थात दुसरी ) होती आणि नवरा मेला तेव्हा तिला ९ वर्षांचे ( अर्थात् त्याच्यापासून झालेले ) मूल होते. त्याच्या मृत्यूच्या वेळी पहिल्या बायकोपासून झालेल्या मुलाचे वय मात्र जरा जास्त होते. ते त्यावेळी १०३ वर्षांचे होते.

आणि शेवटी माणसाने निद्रेसाठी निर्माण केलेली शय्या हीच त्याची चिरनिद्रा घेण्यासाठी घडविलेली मृत्युशय्या बनते. विश्रांती घेण्यासाठी बनविलेल्या पलंगावरच त्याला कायमची विश्रांती घ्यावी लागते. ज्या पलंगाचा आधार घेऊन तो या जगात पाऊल टाकतो त्याच पलंगाचा आधार घेऊन त्याला या जगातून पाऊल उचलावे लागते. पांढरवेश परिचारिकांच्या सान्निध्यात, पांढऱ्या पलंगपोसावर त्याचा देह पांढरा फटफटीत होतो. सगेसोयरे माना गुडघ्यात घालून दूर बसलेले असतात. अगदी जवळ असतो पलंग. निष्प्राण होत असलेल्या देहालाही आत्मीयतेने जवळ करणारा पलंग.

सर्वसामान्य माणूस आपला देह शेवटी पलंगावरच ठेवतो. मग तो जराजर्जर देह असो नाहीतर व्याधिग्रस्त देह असो. याला अपवाद फक्त रणांगणात शरशय्येवर निद्रिस्त होणाऱ्या शूराचा, जीवनाला भिऊन पाण्यात किंवा आगीत देह टाकणाऱ्या आत्मघातकी, भ्याडाचा, आकाशात भरारी मारायला निघालेल्या आणि अनंत आकाशात असतानाच अनंतात विलीन होणाऱ्या वीराचा, नाहीतर रस्त्यावर किंवा रुळावर अपघाती मरण पावणाऱ्या हतभाग्याचा. बाकी सर्वांच्या जीवन-प्रवासाची सुरुवात होते पलंगावर आणि त्या प्रवासाचा शेवटही होतो पलंगावर. पलंगापासून पलंगापर्यंतचा हा रोमहर्षक प्रवास म्हणजेच मानवी जीवन ! ● ● ●












# तोड

**. . . . म्हाताऱ्या मावशीला घरात ठिवावं त बाईल देखू सकत नाय . . . बायलीला वढून भाईर काढावं तर सौंसाराचा इस्कोट . . . अशा परिस्थितीत मायंबा न्हाव्यानं सुचविलेली ही तोड . . .**



गडात पडून मस आवाद झाल्यानं काळोख चांगलाच पडला होता. त्या टायमाला बोरी शिरोलीचा दाजी कुंभार राजूरीच्या बाजारात मडकी विडकी ओपायची झाल्यानं आपल्या मरतुकड्या घोड्यावर बसून गावाकडं फिराडू होत होता. कधी नवस ती आज त्याची सारीच्या सारी मडकी खपल्यानं, त्याच्या मळकट कवज्याच्या खिश्यात बरीच चिल्लर जमा झाली होती. त्यामुळं आतां रस्त्यानं चालताना घोडं जर एखाद जागी दगड-धोंड्यावर ठेचाळलं, तर त्याच्या खिश्यातील चिल्लरीचा खळकन् आवाज होई . . . अन् मग दाजीला आज बरीच कमाई झालीय, ह्या गोष्टीची जाणीव होई.

खरं पाहता घोडा दगडावर ठेचाळताना जेव्हा चिल्लरीचा खळकन् आवाज होई, तेव्हा गरीब दुबळ्या दाजीनं मोहरून जायला हवं होतं. जादा कमाईच्या नादात स्वत:ला विसरून जायला हवं होतं. पण तसं मात्र काही एक झालं नाही. कारण काय तर आज सकाळी राम प्रहरात त्याच्या बायलीनं, रुक्मानं त्याला बाजारला निघताना साऱ्या गावाला दौंडी देणाऱ्या लुकड्या नाऱ्या महारागत बेंबीच्या देठापून ओरडून सांगितलं होतं,

'धनी, आज दोन रोज तुमच्या बेल्ह्याच्या म्हताऱ्या मावशीनं आपल्या घरात ईनाकारण तळ दिलाय. तव्हा तिला घराभाईर वढून काढा. तिला तिच्या दिरापं बेल्ह्याला न्ह्यन घाला. नाह्यतं तुमी बाजरा गेल्याव मी लय भंडोडा करील. तुमच्या म्हताऱ्या मावशीला तिच्या गठुड्यासुगाट घराभाईर काडील. हां, उजून सवदानं बोलू देयची नाह्य . . .'

आपल्या हटवादी आव्रंग बायकोनं खरोखर आपल्या मावशीला तिच्या गठुड्यासुगाट घराबाहेर काढलं असेल, ह्या विचारानं दाजी कुंभार उदास मनानं घराकडं फिराडू होत होता. चितागती होण्यागत त्याची ही स्थिती! मग तो आजच्या जादा कमाईच्या नादात स्वत:ला हरवून कसा काय बसणार ?

गाव जेव्हा अर्धा कोस राहिलं तेव्हा दाजी आपल्या मरतुकड्या पण इमानी अश्या घोड्यावरून खाली उतरला. घोड्याच्या तोंडावरून मोठ्या मायेनं हात फिरवीत विचार करू लागला. आता घरी गेल्यावर काय करावं ? विचार करता करता दाजी कुंभाराचं डोकं त्याच्या चक्रागत गरारा फिरू लागलं. निरनिराळ्या विचारांची मडकी त्याच्या टाळक्यात तयार होऊ लागली . . .

' . . . घरात म्हाताऱ्या मावशीला ठिवावं का नाह्य ? जर ठिवावं त बाईल तिला देखू सकत नाह्य. तिला पाण्यात पगतीय. बरं बायलीला घराभाईर वढून काडून मावशीसंगं ऱ्हावं त सौंसाराचा इस्कोट ! मावशीला भाईर काडून बायलीसंगं सुखानं ऱ्हावं त बिचाऱ्या मावशीनं कुटं जावं, कुन्हाकं ऱ्हावं ? तिला त आपल्याबिगार मायेचं दुसरं कोन्हीच नाह्य. तिच्या दिरानं तर तिला घराभाएर काडलंय. उंबऱ्यात हुबं ऱ्हाव दिनार नाह्य, असं म्हंतीय. तिला जर अशीच बेल्ह्याला त्यापं न्ह्यन घालावी, त त्यो आपल्याला खेटर काडणार . . .

'काय करावं ब्वा ? आपल्याला त मावशीवी पाह्यजे आन् बाईल बी ! रुक्मा मावशीला घरात सुखानं ऱ्हाव दिल, ह्यावंच काईतरी फस्कल्लास तोड काडली पायजे. जेणं मावशी आपल्याकं मरस्तोवर सुखानं ऱ्हाएल' . . . दाजी फर्स्ट क्लास तोड काढीत असतानाच त्याचं इमानी घोडं जरासं बिचकलं. फुरफुर करू लागलं. अन् कां कोण जाणे मोठ्यानं खिंकाळलंसुद्धा! त्यासरशी दाजीनं घोड्याच्या तोंडावरून हात काढीत मागं वळून बघितलं. तो दोन तीन माणसं काळोखाचा फायदा घेऊन त्याच्या रोखानं पळत येत होती. दाजीचा हात लगेच कबज्याच्या खिश्यातील चिल्लरीकडं गेला. अन् त्याला दरदरून घाम फुटला. मग त्याला कुठला दम? त्यानं लगेच घोड्यावर टांग टाकली. इमानी घोड्यानं धन्यावरचा तो वखत ओळखला. तो 'चेतका'गत सुसाट सुटला...

दाजीचं घोडं गावात येऊन नेमकं चावडीपुढं थांबलं. चावडीत त्यावेळी अंधारात वसून कुणीतरी चिलीम फुंकित बसलं होतं. दाजी घाबरत घुबरत बोलला,

'क् . . .क् . . . कोन्हाय् चावडीत ?'

'आँ, कोण दाजी ? आरं, मी हायना तुहा जीवाचा दोस मायंबा न्हावी. कां रं ? ये की दम माराय् . . .'

दाजी चिलमीचा चांगला दम मारून आपल्यावर आलेल्या प्रसंगाची गोष्ट सांगणार होता. पण त्यानं एकदम डायरेक मायंबाला म्हणलं,

'मैत्रा मायंबा, माह्या घरशी काय बात ?'

तसा चिलीम टाकून मायंबा न्हावी उठला. दाजीजवळ येऊन गंभीरपणानं बोलला,

'अरारा ! लय वंगाळ. सांगोत नाह्य दाजी, आयच्यानं . . .'

'पर सांग की बयेद्वार, काय झालं त्य . . .'

'रुक्मा वह्यणीनं तुझ्या मागारी लय भंडोडा केला बावा. आपल्या मावशीला तिनं दोपारच्या पारी गठुड्यासुगाट घराभाएर वढून काडलं. म्हातारीची वह्यणीनं लयेय रं दवना केली. मला त बघवाना . . .'

'काय म्हंत्तूस ?'

'काय सांगू आत्ता ?'

'आत्ता मावशी कुठाय ?'

'कुन्हीकं जाणार ती थकली मांदली मावली ? तिचं शरीर तिला जड. वसलीय तुह्याच घराच्या वटचाव तिचं गठूडं ठ्व्यून. म्या म्हणलं, माझ्या घरी चाल. त येया तयार नाह्य. तिथंच बसली ठिय्या देवून.'

'मंग आत्तारं मायंबा ?'

'बग ब्वा. हाय ह्य आसं. जगाला हसून् आपलं रडू. नाह्य का ?'

'वह्य. पर कारं, तुला यखांदी तोड सुसती का ? जेणं तुही वह्यणी आपल्या मावशीला मरस्तोव्हर सुखानं खाव पिव घालील . . .'

'दाजी, तुला म्हाल्ताय. मी जातीनं न्हावी; पर तोड काडाय माहं डोकं लय चल्लाक म्हून . . .'

कारान त्यापंच तुहा समदा यव्हार नाह्य का ?'

'कसा बोल्लास ? मंग आईक तोड . . .'

'सांग कनी . . .'

मायंबा न्हाव्यानं सांगितलेली तोड ऐकून दाजी पार चाटच पडला. त्यानं त्या भरात मायंबाच्या हातावर इतकी मोठी टाळी दिली की मायंबाच्या हाताला झिणझिण्या आल्या.

निम्मी रात पलटून गेली होती. म्हाताऱ्या रात्रीनं काळोखाच्या पाटीखाली सारं काही झाकून ठेवलं होतं. त्यावेळी दाजी झोपेतून आपसुक्यास जागा झाला. उठून बसला. जरासा मोठ्यानं खाकरला. मग कसली तरी चाहूल घेऊ लागला. आणि एकाएकी चमकला. गोधडी तोंडावर घेऊन बिनघोरपणे झोपलेल्या आपल्या बायकोला गदगदा हलवीत तो म्हणाला,

'ये, आगं ये ऽ . . .'

झोपेतून उठून डोळं चोळीत त्याची बायको तरासून बोलली,

'कां जीव चाल्लाय ?'

'आगं, कसला कायनुं आवाज आयकुं यतोय आपल्या वटचावरनं. पग तरी . .'

त्या बोलानं रुक्माची झोप उडाली. मशेरीचा बोकणा भरून ती घोईनं उठली. बंद कवाडाजवळ गेली. नि बंद असलेल्या कवाडाच्या भल्यामोठ्या सापटीतून वटचावरनं कसला आवाज ऐकू येतोय, हे पाहू लागली. तिच्या पाठीमागं दाजी बी येऊन उभा होता.

बाहेर ओटयावर दाजीची म्हातारी मावशी आपलं गठुडं सोडून एक एक दागिना बाहेर काढत होती. डोळ्यांसमोर धरून निरखत होती. आणि मग स्वत:शीच खदखदा हसत होती. . .

अडीच तोळ्याची बोरमाळ, बारा पुतळ्या न् एक पानाचं गाठलं, डोरलं, गरसूळ, पाटल्या, नथ, हे सोन्याचं दागिनं. ग्वाट, जोडवी, याळा, मासोळ्या, मोठ्या घाटाचं तोढं, हे चांदीचं दागिनं. हे सारं क्रमाक्रमानं नीट पाहिल्यावर म्हातारी पुन्हा ते डाग आपल्या गठुड्यात बांधू लागली.

## द. स. काकडे

तसा रुक्मानं दाजीला जोराचा चिमटा घेतला. हळू बोलली,

'वया, तुमच्या मावशीकं कितीवं ह्य डाग ?'

'खरच ब्वा, मी सुदिक तुह्यागत चाट पडलोय. जर आपून तिला सुखानं संबाळलं असतं, त ह्य समदं डाग ती मेल्याव तुला नसतं कां झालं ?'

'व्हय बया, पर मला ह्या डागांइखी कुटं माह्यती व्हती ? नाह्यतं म्या नसतं म्हातारीला भाएर काडलं . . .'

'मंग आत्ता ?'

'आवं, तुमी तुमच्या मावशीला घरामंदी आणा. तिला मी पुन्ना नाह्य घराभाएर काडणार.'

'पर ती आत्ता अजून घरात यईल का ?'

'यईल ब. कवाड त उगडा पह्यलं.'

दाजीनं कवाड उघडलं तशी म्हातारी घाबरून उठली. आपलं डागाचं गठुडं खाकेला मारून लगलगा चालू लागली. दाजी तिला आडवा झाला.

'मावश्ये कुन्हकं चाल्लीस ?'

'चाल्ले म्हसणात. तुला काय कराचंय ? व्हय बाजूला.' म्हातारी रागानं बोलली.

'गठुडं दय मपं. मंग जा.'

'व्वा ऽ , श्येणाच हैस की. त्यात मपल्या जल्माची दवलत हाय दवलत. हैस कुटं तू आन तुही ती ?' असं म्हणून म्हातारी परत चालू लागली. दाजीनं तिचा सुरकतलेला हात पकडला. बोलला,

'ह्या डागांचं काय करणार तू मावश्ये?'

'येड्या पिरा, मी आता यखांदा धरमाचा पूत बघील. त्यापं ह्य दिल. आन् म्हणंल, बाबा ह्याच्या बदली मला मरस्तव्हर सुखानं संबाळ, बास ! तुपल्याकं न्हाऊन तुला ह्य डाग देणार व्हत्ये. पण तुह्या बायलीनं रंग उधाळला. तिनं माही वज राखली नाह्य. आत्ता तुमा दोगांचं त्वांड मला पाह्यचं नाह्य. सोड माहा हात . . .'

रुक्मा पुढं झाली. म्हतारीच्या पायावर डोकं ठेवून तळमळून बोलली,

'अत्त्याबाय, गुन्ना घडला मपून. उजून नाह्य घडणार. चला घरामंदी. मला बी सासूबाय न्हायती. तुमीच आत्ता माह्या सासूबाय. माही चूक पदरात घ्या.'

'व्हय मावश्ये, हिला पग पचिताप झालाय. आत्ता तूच हिची सासू म्हून राघत न्हा चाल . . .'

म्हातारी दाजीकड पाहून कसल्या तरी अर्थानं हासली. बोलली,

'तुमा दोगाना काय वाटलं, माह्या गठुड्यात निस्त्या चिंदघा हैती वह्य ? आरं, तशी कोल्डी असत्ये त तुमाप आलेच नसत्ये. तिकंच बेल्ह्यात यखांदी हीर बाख जवळ केली असती. बरं जावंदे, समदं दागिनं तुमच्या हवाली करत्ये.'

घरात आल्यावर आपल्या गठुड्यातलं सारं सोन्या चांदीचं डाग दाजीच्या सवादघा करीत म्हातारी बोलली,

'दाजी, व्ह याक राह्यलंच. ह्या गावात सावकारी कोण करतं बावा.'

'संकर तेली. कां ?'

'त पग. सकाळी त्यच्याकं जा. आन ह्य डाग त्यच्याकं गहान ठू. तुमी दोगं का म्हून पुसाल, त अैका. माहा दीर अजून ह्या डागाच्या तपासासाठी माह्या पाळतीवं हाये. मला तो लुबाडणार. म्हून असं सावद असलीलं बरं.'

'मंग ह्य डाग मला घालाय कवा मिळणार आत्त्याबाय ?' रुक्मा घाबरून बोलली.

'मी मेल्याव ह्य डाग तुमचंच. मंग खुश्याल ह्य डाग सावकाराकून सोडायचं. आन् रुक्मा त्वां त्य घालून खुश्याल मिरवायचं . . .'

'खरच आत्त्याबाय, तुमी किती चांगल्यावं . . .' रुक्मा म्हतारीच्या पाया पडत पुन्हा बोलली. अन् म्हातारी किती दिवसानी मरणार, ह्याचा अंदाज करू लागली.

सकाळ झाली. दाजीनं सारं डाग धोतरात बांधलं. मग तो गावात सावकारी करणाऱ्या शंकर तेल्याकडं न जाता सरळ मायंबा न्हाव्याच्या घरी गेला. आणि सारं डाग त्याच्या पुढ्यात ठेवून तो हसत बोलला,

'चल्लाक डोक्याच्या मैना, तूं ह्य माह्या राधा वह्यनीचं डाग घ्यून राती मावशीकं कंदी आला व्हतास ? आन् तिला तोड वठवायची आयड्या सांगून घरी कंदी फिराडू झालास ?' ● ● ●

भारतीय क्रिकेटचा कंठमणी

# कर्नल सी. के. नायडू



कर्नल सी. के. नायडूंच्या गतवर्षी झालेल्या निधनाने भारतीय क्रिकेटमधील एक तेजस्वी तारा अस्तंगत झाला, एक अलौकिक व्यक्तिमत्व काळाच्या पडद्या-आड गेले. धावसंख्येच्या हिशेबाने त्यांच्या कर्तृत्त्वाचे मोजमाप करता येणार नाही. धावांचे डोंगर रचणारे फलंदाज आपल्याकडे बरेच झाले. पण लोकप्रियतेच्या बाबतीत नायडूंचा जोड मिळणे कठीण.

हातात बॅट घेऊन नायडू विकेटकडे निघाले की आता आगळा डाव आपल्याला पहावयाला मिळेल याबद्दल प्रेक्षक निःशंक असत. प्रेक्षकांची अपेक्षा पूर्ण करण्यास ते सहसा चुकत नसत. बॅट ही चेंडूला झोडपण्यासाठी आहे याचा विसर त्याना कधीही पडत नसे. कुस्तीत गामा, हॉकीत ध्यानचंद तशी क्रिकेटमध्ये त्यांची कीर्ती होती. धावसंख्या फुगवून रटाळ खेळ खेळत बसण्याचा त्याना मनस्वी कंटाळा. फलंदाजी तडाखेबाज करायची हे त्यांचे ब्रीद असे. आपल्या झंझावती खेळाने ते डावात असा काही रंग आणीत की त्यांच्या त्या डावाची स्मृती क्रिकेट-प्रेमिकांच्या मनात चिरकाल टिके. शतकवीर म्हणून गाजलेले फलंदाज आपल्याकडे बरेच झाले. पण हमखास षट्कार मारणारे फक्त सी. के. च. त्याबाबतीत त्यांची बरोबरी कुणी करू शकलेले नाही.

**शंभर मिनिटात ११ षट्कार नि १३ चौकार**

नायडूंची जन्मभूमी नागपूर. त्यांचे वडील अन् चुलते क्रिकेटचे शौकिन होते. अन् ते उभयता रणजींबरोबर विलायतेत शिकत होते. क्रिकेटप्रेमाचा वारसा नायडूना वडिलांकडून मिळाला. पुढे १९१६ सालापासून त्यानी चौरंगी सामन्यात खेळण्यास सुरूवात केली अन् मग ते नावारूपाला आले. १९२६ साली त्यानी ऑर्थर गिलीगनच्या नेतृत्वाखाली इकडे आलेल्या एम. सी. सी. संघाविरुद्ध त्यानी धावांची जी आतषबाजी केली त्यामुळे त्यांचे नाव भारतात सर्वतोमुखी झाले. एम. सी. सी. च्या जी. एफ्. अर्ल नावाच्या फलंदाजाने हिंदु संघाविरुद्ध ९ षट्कार मारून एक विक्रम केला पण नायडूनी त्याच्यावर ताण केली. त्यानी एम्. सी. सी. विरुद्ध १०० मिनिटांत ११ षट्कार अन् १३ चौकार मारून १५३ धावा करून एक नवीनच विक्रम केला. तेंव्हापासून ते लोकप्रियतेच्या शिखरावर जे एकदा आरूढ झाले ते कायमचेच. सी. के. म्हणजे षट्कार असे जणू समीकरणच झाले म्हणाना. चौरंगी पंचरंगी सामने त्यानी गाजविले अन् १९३२ च्या पहिल्या अधिकृत दौऱ्यावर ते विलायतेसही जाऊन आले. त्यावेळी ते ३७ च्या घरात असूनही त्यानी डोळ्यात भरण्यासारखी कामगिरी तिथे बजावली.

अरविंद ताटके

'विस्डेन' वार्षिकाने आपल्या क्रिकेटपटूंच्या पंचायतनात त्यांचा समावेश करून म्हटले —' संघाचे सुदैव की त्यात नायडूंसारख्या सर्वोत्तम फलंदाजाचा समावेश झाला होता.' चाळीशी उलटल्यावर १९३६ च्या विलायत दौऱ्यावर दुसऱ्यांदा जाण्याची संधीही त्याना लाभली. १९३२-च्या दौऱ्यात त्यानी १८६२ धावा करून ७९ विकेटस् घेतल्या. त्यावेळी त्यानी ३२ षट्कार मारले. छत्तीसच्या इंग्लंड सफरीतही हजाराच्या वर धावा काढून विकेटस्चे अर्धशतक त्यानी ओलांडलेच. उमेदीचा काळ संपल्यानंतरच त्याना दोन वेळा इंग्लंडला जाण्याची संधी मिळाली त्यामुळे कसोटी सामन्यात त्यांचे तेज फारसे पडले नाही. पण त्यांच्या शैलीदार अन् आक्रमक खेळामुळे भारतात मात्र ते क्रिकेट रसिकांच्या गळ्यातले ताईत बनले.

**बहुरंगी नि अष्टपैलू व्यक्तिमत्व**

कृष्णवर्णी नायडूंना उंचीचे वरदान होते. क्षेत्ररक्षणात त्यांचा हातखंडा. क्रीडांगणावरही शिस्त पाळण्यात ते कधी चुकायचे नाहीत. पोलादी मनगटे अन् घारीसारखी नजर या ईश्वरदत्त देणग्यांमुळे त्यांची फलंदाजी शैलीदार वाटे

नि त्यामुळेच त्यांचा खेळ आक्रमक स्वरूपाचा वाटायचा. ऑन, ऑफ अन् ड्राईव्हज्चे त्यांचे फटके पहाणे म्हणजे नुसती मेजवानी असायची. खेळातली सहजता हा त्यांचा खास गुण. त्यानी क्रिकेटमध्ये प्रथम प्रवेश केला मंदगती गोलंदाज म्हणून पण नैसर्गिक गुणांमुळे पुढे ते धडाडीचे फलंदाज म्हणून प्रख्याती पावले. क्षेत्ररक्षण हाही त्यांचा एक खास प्रांत म्हणून सांगता येईल. इंग्लंडचा वली हॅमंड अगर वेस्ट इंडीजचा लिअरी कॉन्स्टंटाईन यांच्या तोडीचे त्यांचे क्षेत्ररक्षण होते. नायडू अन् कॉन्स्टंटाईन यांच्यात साम्यही विलक्षण होते. दोघेही धडाडीचे फलंदाज अन् चमकदार खेळाचे चाहते. दोघेही उत्तम क्षेत्ररक्षक. फरक हा की कॉन्स्टंटाईन हा वेगवान बोलर तर नायडू हे मंदगती गोलंदाज. नायडूंना 'काळा ब्रॅडमन' म्हणतात. पण ते नाव बरोबर आहे असे म्हणता येणार नाही. 'हिंदी कॉन्स्टंटाईन' असा फार तर त्यांचा उल्लेख करता येईल.

१९३२ साली भारतीय संघ विलायतेच्या पहिल्या अधिकृत दौऱ्यावर गेला तेव्हा भारतीय संघाचे नेतृत्व नायडूंकडेच यावयास हवे होते. खेळातला चतुरस्रपणा, लोकप्रियता, वय अन् अनुभव या चतु:सूत्रीच्या बळावर कर्णधारपदी त्यांचीच निवड योग्य ठरली असती. पण तेव्हा संस्थानिकांचे प्रस्थ आपल्याकडे फार असल्याने त्यांचा कप्तानपदाचा हक्क डावलला गेला. १९३६ सालीही त्याचीच पुनरावृत्ती झाली. त्यावर्षी विलायत दौऱ्याचे नेतृत्व विजयानगरच्या महाराजांकडे (विझी) देण्यात आले. तरीही नायडूंनी अपमान गिळला अन् चाळीशी उलटली होती तरी इंग्लंडमध्ये हजारच्या (११०२) वर धावा अन् ५१ बळी घेऊन आपली संघातली उपयुक्तता त्यानी पटवून दिली. त्यावर्षी हजार धावा फक्त मर्चंट अन् नायडू यानीच केल्या. वयाच्या दृष्टीने पहाता त्यांची ती कामगिरी कौतुकास्पदच होती. म्हणूनच डॉ. राधाकृष्णनसारखे तत्त्वज्ञ म्हणायचे, "नायडू, तुमची बॅटींग पहाण्यासाठीच मी ऑक्सफर्डहून लंडनला आलो."

## नायडू म्हणजे मूर्तिमंत चैतन्य

भारताप्रमाणे विदेशातही नायडूना चाहते मिळाले. विख्यात क्रीडासमीक्षक नेव्हिल कार्डस्ही त्यांच्या बॅटींगवर मोहीत झाला होता. त्याने नायडूंबद्दल म्हटले आहे — 'नायडू चांगले उंच आहेत. मर्दपणाचा फुंद त्यांच्या व्यक्तिमत्वावर सदैव ओसंडत असतो. आक्रमक फलंदाजीचा बेलभंडार ते नेहमीच उचलतात. मनगटांप्रमाणे त्यांच्या पायांची हालचालही मोठी मनोवेधक असते. समोर आलेल्या चेंडूवर गरुड झेप घेण्यात ते नेहमीच दक्ष असतात.' ज्या महंमद निसारची वेगवान गोलंदाजी ते पुढे जाऊन चोपून काढीत त्याची आठवणही नायडूंच्या कर्तृत्वावर प्रकाश पाडणारी आहे. १९५५ साली भारतीय संघ पाकिस्तानात गेला तेव्हाची गोष्ट. त्यावेळी पाकिस्तान क्षेत्ररक्षकानी व्यूह रचून वांझोटी (Negative) गोलंदाजी टाकण्याचे अस्त्र बाहेर काढले होते. त्यामुळे भारतीय फलंदाज बिचकत बिचकत खेळत होते. तो सामना निसार पहात बसला होता. भारतीय फलंदाजांची कमकुवत अन् भित्री फलंदाजी पाहून त्याला फार हळहळ वाटली अन् मग त्या आवेगात तो जवळच्या बसलेल्या एका भारतीय क्रिकेट समीक्षकाला (श्री. गुरुनायन्) म्हणाला— "नायडूंना असले क्षेत्ररक्षण अन् असली निगेटिव्ह बोलींग टाकण्याची हिंमत मला खास झाली नसती. कारण अशा गोलंदाजीच्या त्यानी पुढे जाऊन चिंधड्या उडविल्या असल्या." वेगवान गोलंदाजी खेळण्यात नायडूंचा कसा हातखंडा होता अन् ती ते कशी निर्भयपणे खेळत त्याची साक्ष निसारच्या उद्गारात पहावयास मिळवे.

## वासष्टाव्या वर्षापर्यंत क्रिकेट खेळले

नायडूनी चौरंगी सामन्यात पाच शतके काढली. दोन मुसलमान संघाविरुद्ध, दोन पार्शीविरुद्ध अन् एक युरोपियन संघाविरुद्ध. चौरंगी सामन्यातल्या सर्व क्रिकेटपटूंपेक्षा त्यानी जास्त धावा केल्या. १९२४ साली प्रो. देवधरांबरोबर १९७ धावांची उच्चांकी भागिदारीही त्यानी केली. पंचरंगी सामन्यात मात्र ते कधी शतक काढू शकले नाहीत. वयाच्या पन्नाशीत १९४५ साली बडोद्याविरुद्ध रणजी करंडक सामन्यात त्यानी द्विशतक काढले. रणजी करंडक सामन्यात त्यानी २३०५ धावा अन् १०४ बळी घेतले. प्रथम श्रेणी सामन्यात त्यानी ८७८१ धावा केल्या, १४ शतके काढली अन् २९९ विकेट्स घेतल्या. वयाच्या ६२ व्या वर्षापर्यंत (१९५७) ते रणजी करंडक सामन्यात खेळत होते त्यावरून त्यांच्या उत्साहाची अन् उत्तम आरोग्याची कल्पना येते.

१९३४ साली जार्डिन संघाविरुद्ध अधिकृत कसोटी सामन्यात नायडूंनी भारतीय संघाचे नेतृत्व केले. रणजी करंडक सामन्यात होळकर संघाचे अन् चौरंगी पंचरंगी सामन्यात हिंदुसंघाचे नेतृत्व तेच करीत. भारतात तरी त्यांच्यासारखा आक्रमक संघनायक झाला नाही असेच म्हणावे लागेल. संघनायकत्वाला लागणारे सारे गुण त्यांच्या ठायी होते अन् त्यांच्यापासून इतर सहकाऱ्याना जशी स्फूर्ती मिळे तशी आपल्याकडे तरी कुणा दुसऱ्याकडून क्वचितच लाभली असेल.

## सोन्याच्या बॅटीचा आहेर

विलायत दौऱ्यात नायडूंकडे नेतेपद न देण्यात जसा त्यांचा अपमान करण्यात आला तोच प्रकार १९३७ साली त्यांच्या वाट्यास पुन्हा आला. टेनिसन संघाविरुद्ध त्यावर्षी भारतीय संघात त्यांची निवड न करून त्यांची मोठीच मानहानी करण्यात आली. हे प्रकार वगळता त्यांच्या इतके मानसन्मानही आपल्याकडील कुणाही क्रिकेटपटूला लाभले नसतील. १९२६ साली त्यांनी षटकारांचा विक्रम केला त्याप्रीत्यर्थ हिंदु जिमखान्याने त्यांचा सत्कार करून एक मोटरसायकल त्यांना बक्षीस दिली. त्यांच्या ५१ व्या वाढदिवशी हिंदु जिमखान्याने महोत्सवी सामना उभारून त्यांना १८००० रुपयांची थैली दिली. क्रिकेटमधून निवृत्त झाल्यावरही त्यांना २१००० हजाराची थैली देण्यात आली. १९५६ साली भारत सरकारने त्यांना 'पद्मभूषण' पदवी दिली. १९६० साली इंग्लंडच्या एम्. सी. सी. ने त्यांना सन्माननीय सभासद करून घेतले. भारतीय क्रिकेट मंडळातल्या निरनिराळ्या अधिकाऱ्यांच्या जागा त्यांनी भूषविल्या त्याप्रमाणे कसोटी सामन्याच्या वेळी नभोवाणीवर तज्ज्ञ म्हणून सामन्याचे समालोचन करण्याचा मानही त्यांना लाभला होता. ज्या बॅटीने त्यांनी पराक्रम गाजविला त्याच्या स्मृतीप्रित्यर्थ म्हणूनच की काय त्यांच्या एकाहत्तराव्या वाढदिवशी मुंबईच्या रुईया बंधूंनी एक छोटीशी सोन्याची बॅट देऊन त्यांचा अपूर्व गौरव केला.

नायडूंचा नोकरीचा काळ इंदूर संस्थानात गेला. तिथे ते कर्नलच्या हुद्यापर्यंत चढले. त्यांच्या नेतृत्वाखाली रणजी करंडक चार वेळा होळकर संघाला मिळाला. शिष्यांची प्रभावळही त्यांनी तयार केली. मुस्ताक अल्ली हे त्यांचे पट्टशिष्य म्हणून सांगता येतील. त्यांचा खेळ आपल्या गुरुप्रमाणेच आक्रमक असे. क्रिकेट खेळत तरी नायडूंना सर्व खेळांची भारी आवड होती. फुटबॉल व हॉकी खेळात तरुणपणी त्यांनी चांगले प्रावीण्य मिळविले होते. बिलियर्ड ते खेळत तसा टेनिसचा नादही त्यांना होता. नेमबाजी, घोड्यावर बसणे अन् मोटार हाकण्यातही ते निष्णात होते. सिगरेट ओढणे हा त्यांचा विरंगुळा. एरवी सी. के. हे खरेखुरे शिपाई गडी होते.

शेवटचे काही महिने नायडू अर्धांगवायूने आजारी होते. ३१ ऑक्टोबरला त्यांचा बहात्तरावा वाढदिवस साजरा झाला. अन् नंतर १४ नोव्हेंबर १९६७ रोजी मंगळवारी पहाटे पावणेदोन वाजता इंदूर येथे कोट्टारी कंकय्या नायडू निधन पावले. भारतीय क्रिकेटच्या या भीष्माचार्याला—सी. कें. ना त्यांचे पट्टशिष्य मुस्ताक अल्ली यांनी पुढीलप्रमाणे श्रद्धांजली वाहिली —

'ते माझे गुरू होते. त्यांचे निधन हा मोठा धक्का आहे. हमखास षटकार मारणारे सी. के. आता पुन्हा नाही दिसणार. क्रिकेट क्षेत्रातले एक ढंगदार व्यक्तित्व काळाच्या आड गेले. क्रीडांगणावर ते जशी झुंज देत तशीच झुंज त्यांनी आजाराशीही दिली.'

गगनचुंबी षटकारांचे शहेनशहा सी. के. आता काही पुन्हा दिसायचे नाहीत. म्हणूनच एकेचाळीस वर्षांपूर्वीच्या त्यांच्या तेजस्वी खेळाच्या स्मृती आठवत, चमकदार खेळाच्या या 'लॉस्ट ऑफ बि रोमन्स'ला, भारतीय क्रिकेटच्या या कंठमण्याला, कंकय्या नायडूना ही श्रद्धांजली!

● ● ●



१९४२ ची गोष्ट. [कार्लेकर] ग्रँड सर्कसचा मुक्काम त्या वर्षीच्या नाताळात कलकत्ता येथे होता. त्या वर्षी सर्कसचे खास आकर्षण म्हणजे रशियाहून खास आणविलेले रशियन जगलर रोडँको बंधू हे होते. त्यांच्याबद्दलची जाहिरात कलकत्ता शहरात खूपच आकर्षक पद्धतीने करण्यात आली होती. त्यामुळे पहिल्या दिवशी सर्कसच्या तंबूवर अफाट गर्दी झाली होती. अवघ्या अर्ध्या तासात तिकीट विक्री बंद होऊन प्रेक्षकानी तंबू खच्चून भरला होता. बँडच्या मधुर सुरात खेळाला सुरवात झाली.

लवकरच ज्यांच्या अद्भुत खेळाची प्रेक्षक उत्सुकतेने वाट पाहत होते ते रोडँको बंधू मंद मंद पावले टाकीत रिंगणात आले व त्यानी रशियन पद्धतीने दोन्ही हात पुढे करून व मान खाली वाकवून प्रेक्षकाना अभिवादन केले. त्याबरोबर प्रेक्षकानी टाळ्यांच्या प्रचंड कडकडाट करून त्यांचे स्वागत केले.

**कोठूनही फेकलेला चेंडू**

प्रथम रोडँको बंधूनी गोळे, बशा, वगैरे हवेत उडवून ते झेलून, दाखविण्याचे छोटे प्रयोग करून दाखविले. एका बंधूचे नाव फिलीप आणि दुसऱ्याचे नाव जोसेफ होते. फिलीपने नंतर खास आकर्षक खेळाला सुरवात केली. त्याने रिंगणात जाहीर केले की प्रेक्षकानी चेंडू कसाही फेकावा तो मी माझ्या तोंडातील लाकडी दांडुक्यावर बरोबर झेलून दाखवितो. त्याप्रमाणे एक मोठा रबरी चेंडू प्रेक्षकांकडे देण्यात आला. प्रेक्षकानी रिंगणात चेंडू कसाही फेकला तरी फिलीप आपल्या तोंडातील लाकडी दांडुक्यावर तो चेंडू बरोबर झेलीत असे. प्रत्यक वेळी टाळ्यांचा प्रचंड कडकडाट होत असे. शेवटी एका प्रेक्षकाने तर कहरच केला. त्याने चेंडू वरून न फेकता भुईसपाट फेकला. परंतु शाब्बास त्या फिलीपची ! त्याने न डगमगता जमिनीवर पालथा पडून

# सर्कस सुंदरीचे प्रेम



तो चालत येणारा चेंडू आपल्या तोंडातील दांडुक्यावर बरोबर झेलला. यावेळी टाळ्यांचा जो प्रचंड कडकडाट झाला, त्याने तंबू हवेत उडून जातो की काय असा क्षणभर भास झाला. भुईसपाट चेंडू फेकणाऱ्या गृहस्थाचा चेहरा मात्र फोटो काढण्यालायक झाला.

यानंतर त्या दोघा बंधूनी पुढील अद्भुत कार्यक्रमास सुरुवात केली. रिंगणात दोन ऑस्ट्रेलियन वेलर घोडे आणण्यात आले. त्यांची पाठ खूपच रुंद होती. ते दोन्ही घोडे खूप पुष्ट व मजबूत होते. हे ऑस्ट्रेलियन घोडे रायडिंगसाठी खूपच उत्कृष्ट असतात. प्रत्येकी सहा हजार रुपयास हे दोन्ही घोडे ऑस्ट्रेलियातून खरेदी करून आणले होते.

घोडे रिंगणात आल्यावर दोघे बंधू दोन घोड्यांवर स्वार झाले. व परस्पर विरुद्ध दिशेने ते घोडे धावू लागले. नंतर धावत्या घोड्यावर उभे राहून त्या दोघा बंधूनी चेंडू व बशा झेलण्याचे प्रयोग करून दाखवले.

## घोड्यावरील अपूर्व कसरत

या पुढचा प्रयोग तर आश्चर्याने थक्क करणारा होता. प्रेक्षकानी फेकलेला चेंडू फिलिपने चालत्या घोड्यावर उभे राहून तोंडातील दांडुक्यावर बरोबर झेलून दाखविला. इतकेच नव्हे तर चेंडू तसाच ठेवून धावणारे घोडे परस्पराजवळ येताच दोघा बंधूनी उडघा मारून घोडे बदलले व पुनः परस्परांजवळ घोडे येताच फिलिपने आपल्या तोंडातील दांडुक्यावर असलेला चेंडू तोंडानेच उडवून तो जोसेफकडे फेकला व जोसेफने तो चेंडू आपल्या तोंडातील दांडुक्यावर झेलला. या अद्भुत प्रयोगानी प्रेक्षक इतके थक्क झाले की त्यानी कित्येक मिनिटे टाळ्यांचा प्रचंड कडकडाट चालू ठेवला.

त्यानंतर फिलिपच्या सर्वात रोमांचकारी प्रयोगास सुरुवात झाली. फिलिपने धावत्या घोड्यावर उभे राहून तोंडातील दांडुक्यावर चेंडू धरला. याच वेळी एक मोठे जळते कडे घोड्यासमोर धरण्यात आले. त्या जळत्या कड्यासमोर येताच फिलिपने तोंडातील चेंडूसह त्या कड्यामधून उड्डाण करून तो परत घोड्याचे पाठीवर चेंडू न पडता उभा राहिला. फिलिपचे हे अपूर्व कसब पाहून प्रेक्षक बेहद्द खूष झाले.

## वडील व आत्या सर्कशीत

रोर्डेको बंधूंचा जन्म रशियातील युक्रेन प्रांताची राजधानी कीव्ह या शहरात झाला. त्यांचे वडील पीटर रोर्डेको एका कारखान्यात मेकॅनिक म्हणून काम करीत होते. १९१७ सालची गोष्ट. त्यावेळी रशियात झारचे राज्य होते. झारच्या जुलूमशाहीला सारी रशियन जनता कंटाळून गेली होती. गरीब लोकांचा त्राता कोणीच उरला नव्हता. तरुण पीटरही याला अपवाद नव्हता. त्यातच एक भयानक घटना घडली व पीटरला देश सोडून परागंदा व्हावे लागले. पीटरचे आईवडील लहानपणीच वारले होते. त्यावेळी पीटर अवघा १५ वर्षांचा होता. त्याला एक धाकटी बहीण होती. तिचे नाव ल्यूसी. तिचे वय १४ वर्षांचे होते. ल्यूसी अत्यंत स्वरुपवान होती. लहानपणीच तिचे सौंदर्य पाहून लोक चकित होत. आईवडील वारल्यानंतर ल्यूसीचा सांभाळ करण्याची जबाबदारी पीटरवर येऊन पडली. पीटरने आपल्या मित्रांच्या सहाय्याने एका कारखान्यात नोकरी मिळवली. त्यावेळी झारच्या जुलमी राजवटीविरुद्ध क्रांती होण्याची चिन्हे दिसू लागली. लेनिनच्या नेतृत्वाखाली कामगार व शेतकरी संघटीत होऊन त्यानी झारची राजवट उलथून पाडण्याचा निश्चय केला होता. उलट क्रांती दडपून टाकण्याचा झारचा आटोकाट प्रयत्न चालला होता.

एके दिवशी पीटर कारखान्यात कामावर गेला. ही संधी साधून झारच्या एका उन्मत्त सरदाराने ल्यूसीला मॉस्कोला पळवून नेले. ल्यूसीवर त्याचा अनेक दिवसापासून डोळा होता. शेवटी संधी साधून त्याने आपल्या हस्तकांकरवी तिला मॉस्कोला पळवून नेले. पीटरच्या काही मित्रानी ही घटना पाहिली व तात्काळ पीटरला बातमी कळविली. ही भयंकर बातमी ऐकताच दुःखाने पीटर जणू वेडाच झाला. क्षणाचाही विलंब न लावता पीटर घोड्यावर स्वार झाला व दौडत मॉस्कोच्या रोखाने निघाला.

## ल्यूसीचा शोध

पीटर आपल्या गोड वागणुकीमुळे फारच लोकप्रिय होता व त्याचे मित्रमंडळही खूप मोठे होते. पीटरबरोबर त्याचे अनेक धाडसी मित्रही मॉस्कोला दौडत निघाले. लवकरच ही टोळी मॉस्कोला येऊन पोहचली. ल्यूसीला पळविणाऱ्या दुष्ट सरदाराचा शोध पीटरने मोठ्या मुष्किलीने लावला. जीवावर उदार झालेला पीटर आपल्या मित्रांच्या साहाय्याने त्या सरदाराच्या महालात घुसला व सरदाराला तलवारीने कंठस्नान घातले व ल्यूसीला बरोबर घेऊन तो तडक घोड्यावर स्वार होऊन कीव्हला परत आला. त्याच्याबरोबर त्याचे सवंगडीही होतेच.

पीटरने अपूर्व साहस करून ल्यूसीची सुटका केली खरी, परंतु त्याचे प्राणही धोक्यात आले. कारण ज्या सरदाराचा पीटरने खून केला तो झारच्या मर्जीतला होता. त्यामुळे झारने तात्काळ पीटरला पकडण्याचा हुकूम सोडला. पीटरलाही या गोष्टीची कल्पना होतीच. त्याने आपल्या मित्रांच्या सहाय्याने मोठ्या नाट्यपूर्ण रीतीने स्वदेशातून पोलंडमध्ये पलायन केले. पीटरने स्त्रीवेष धारण करून आपल्या मित्राची पत्नी बनून व ल्यूसीने पुरुष वेष धारण करून स्वदेशातून पलायन केले. दोघांची भेट पूर्वी ठरल्याप्रमाणे वॉर्सा येथे झाली. तेथून ते दोघे जर्मनीत गेले.



जर्मनीत त्यावेळी युद्धाचे वातावरण होते. पीटरने तेथे जर्मन सैन्यात नोकरी धरली. व ल्यूसीने परिचारिकेचे काम पत्करले. परंतु लवकरच जर्मनीचा पराभव झाला व युद्ध थांबले. ल्यूसी व पीटर बर्लीन येथे राहू लागले.

यावेळी जर्मनीत 'हॅगनबेग सर्कस' प्रसिद्ध होती. बर्लिनमध्ये त्या सर्कसचा मुक्काम असताना पीटर व ल्यूसी यानी त्या सर्कसमध्ये प्रवेश मिळविला. पीटर उत्तम घोडेस्वार होता. त्यामुळे थोड्याच दिवसात त्याने रायडिंगचे काम आत्मसात् केले. ल्यूसीला रशियन नृत्य उत्तम येत असे. (सोलर डान्स) अशा रीतीने बहीण-भावांचा त्या सर्कसमध्ये उत्तम जम बसला.

या सर्कसमध्ये एक रशियन कुटुंब होते. त्या कुटुंबातील वीरा नावाच्या सुस्वरुप मुलीबरोबर पीटरचा विवाह झाला. तर निकोलय नावाच्या वीराचा एक भाऊ होता. त्याच्याबरोबर ल्यूसीचा विवाह झाला. काही दिवस सर्कसमध्ये काढल्यानंतर पीटरला स्वदेशात जाण्याची संधी मिळाली. यावेळी रशियात क्रांती होऊन जुलमी झारची सत्ता नष्ट झाली होती व कामगार शेतकरी यांची कम्युनिस्ट सत्ता प्रस्थापित झाली होती.

## पहिली रशियन सर्कस

रशियात कम्युनिस्ट सत्ता आल्यानंतर लवकरच पीटर आणि त्याची पत्नी आणि ल्यूसी व तिचा पती निकोलाय रशियात परत आले. यावेळी कीव्ह शहरात त्याच्या मित्रानी त्याचे प्रचंड स्वागत केले. इतकेच नव्हे तर त्यावेळच्या सत्ताधाऱ्यानी त्याला मॉस्कोला बोलावून त्याचा बहुमान केला.

मॉस्कोला गेल्यानंतर त्याने रशियन अधिकाऱ्यांसमोर आपल्या 'स्टेट सर्कस ऑफ रशिया' या योजनेविषयी विचार मांडले. रशियात त्यावेळी एकही सर्कस नव्हती. म्हणून रशियन सरकारने त्या योजनेस ताबडतोब मंजुरी दिली व पीटरच्या नेतृत्वाखाली पहिली रशियन सर्कस १९२२ साली स्थापन झाली.

## भारतात येण्याचे आमंत्रण

या रशियन सर्कसमध्ये असताना पीटरला दोन पुत्ररत्नांचा लाभ झाला. त्यांची नावे त्याने जोसेफ आणि फिलिप अशी ठेवली. त्या दोघा भावांमध्ये फक्त एक वर्षाचे अंतर होते. दोघा भावांच्या चेहेऱ्यात विलक्षण साम्य होते. पीटरने दोघानाही लहानपणापासून कसरतीची अनेक कामे शिकविली. इतकेच नव्हे तर खाजगी शिक्षक ठेवून त्यांच्या शालेय शिक्षणाचीही उत्तम व्यवस्था केली. त्यामुळे ते दोघे भाऊ उत्तम कसरतपटू झालेच. शिवाय सुसंस्कृतही झाले. या दोघा भावाना पीटरने जगलिंगचे काम (गोळे व बशा हवेत उंच उडवून परत हातात अचूक झेलण्याची कसरत) शिकविले. त्यांच्या या कामाची ख्याती साऱ्या युरोपभर पसरली. त्यांचे फोटो अनेक वर्तमानपत्रातून व नियतकालिकातून प्रसिद्ध झाले. त्यापैकीच एक नियतकालिक कार्लेकर ग्रँड सर्कसचे मॅनेजर रामभाऊ जोशी यांच्या वाचनात आले. अशा आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या रशियन सर्कसपटूला आपल्या सर्कसमध्ये आणल्यास भारतीय जनतेला त्यांच्या उत्कृष्ट कलादर्शनाचा लाभ होईल, सर्कसलाही आर्थिक लाभ होईल, अशी त्यांची खात्री पटली. प्रो. शंकररावांच्या अनुमतीने त्यांनी रोडॅको बंधूना भारतात येण्याचे आमंत्रण दिले.

भारतात व इतर आशियायी देशात जाऊन आपली कला दाखवावी असे रोडॅको बंधूना वाटत होतेच. ही संधी पाहून त्याना आनंदच झाला. दरमहा ५ हजार रुपये पगारावर कलकत्ता मुक्कामी ते कार्लेकर ग्रँड सर्कसमध्ये येऊन दाखल झाले. पण ते भारतात आले ती वेळ अत्यंत अपशकुनी असली पाहिजे. कारण लवकरच एक भयंकर घटना घडली.

ज्यावेळी 'कार्लेकर ग्रँड सर्कस'चा मुक्काम कलकत्ता शहरात होता. त्याच वेळी 'इसाको' या जपानी सर्कसचा मुक्कामही कलकत्ता येथेच होता. त्या सर्कसमध्ये 'लारा' नावाची एक षोडशवर्षीय लावण्यवती रशियन युवती सोलरनृत्याचा फार बहारीचा कार्यक्रम करीत असे. लाराच्या सौंदर्याचे वर्णन करताना शब्द अपुरे पडावेत इतकी ती सौंदर्यवती होती. 'इसाको' सर्कसमध्ये ती व तिचे आई-वडील एवढेच एक रशियन कुटुंब होते. त्याना जेव्हा रोडॅको बंधूंची कीर्ती समजली तेव्हा साहजिकच त्यानी त्यांचा परिचय करून घेतला. लाराच्या सौंदर्याने दोघे बंधू दिपून गेले. फिलिपच्या व्यक्तिमत्वावर लारा मोहीत झाली होती. तो देखणा व हसतमुख असे. फिलिप व लारा एकमेकांकडे आकर्षित झाले. जोसेफचेही लारावर प्रेम बसले. लारा दोघांशीही हसून खेळून वागे. प्रत्येकास वाटे की हिचे प्रेम आपल्यावरच आहे.

## तंबूमधील प्रसंग

एके दिवशी लारा व फिलिप चित्रपट पहावयास गेले असताना जोसेफही त्यांच्या मागोमाग त्याना न कळत गेला व चित्रपट सुरू झाल्यावर हळूच त्या दोघांच्यामध्ये येऊन बसला. लारा व फिलिप याना या गोष्टीची काहीच कल्पना नव्हती. ती दोघे एकमेकांच्या गळ्यात गळा घालून चित्रपट पहात होती. त्याचवेळी लाराने फिलिपला सांगून टाकले की "माझे तुझ्यावर प्रेम आहे. मी तुझ्याशीच विवाह करणार. माकडतोंड्या जोसेफ मला मुळीच आवडत नाही." हे ऐकून मागे बसलेल्या जोसेफच्या अंगाचा भडका उडाला. तो ताबडतोब चित्रपटगृहातून बाहेर पडून घरी आला.

या अपमानाचा फिलिपवर सूड घेऊन बदला घेण्याचे त्याने ठरविले. ज्या घोड्यावर फिलिप काम करीत असे, त्या घोड्याला खेळ सुरू होण्यापूर्वी थोडा वेळ त्याने कुसुंबा नावाचा मादक पदार्थ खाऊ घातला होता. त्यामुळे खेळाच्या वेळी तो घोडा बेफाम झाला होता. पण जिद्दीने फिलिपने प्रयोगास सुरुवात केली. परंतु घोडा इतका आवाक्याबाहेर गेला की त्याचा एकही प्रयोग यशस्वी होईना. जाळ्याच्या कड्यातून उडी घेण्याच्यावेळी तर फिलिपचा तोल जाऊन तो जाळ्यावरच पडला. त्याचे सर्व कपडे पेटले व रिंगणाशेजारी असलेल्या एका लोखंडी मेखेवर आदळला. त्याच्या डोक्याला भयंकर जखम झाली. व तो बेशुद्ध पडला. लोकांनी त्याचे कपडे विझवले व त्यास दवाखान्यात नेले. परंतु त्याची जखम इतकी तीव्र होती व सर्वांग इतके भाजून निघाले होते की त्याचे प्राणोत्क्रमण झाले.

## शोककारक शेवट

लाराला ही बातमी कळताच ती धावतच दवाखान्यात आली. आपल्या लाडक्या फिलिपचे शव पाहताच तिने जोराने किंकाळी फोडली व त्याच्या शवावर ती कोसळली ती कायमचीच. तिची प्राणज्योत फिलिपच्या प्राणज्योतीत विलीन झाली.

या सर्व घटनांचा जोसेफच्या मनावर इतका परिणाम झाला की त्याला वेडच लागले. आपल्या दुष्कृत्याचा त्याला भयंकर पश्चाताप झाला. शेवटी प्रो. शंकरराव कार्लेकर यानी त्याची रशियात रवानगी केली.

● ● ●



### गवई 'रन-आऊट' झाला !

संगीत कलानिधी मास्तर कृष्णराव ह्याना क्रिकेटचं फार वेड आहे. कुठेही क्रिकेटचा मोठा सामना असला की मास्तर तेथे हजर असतात. एकदा मास्तर एका गाण्याच्या बैठकीला गेले असताना गाणारा एकाएकी बेसूर झाला त्याबरोबर शेजारी बसलेल्या आपल्या मित्राला मास्तर म्हणाले, "अरे, हा 'रन-आऊट' झाला बघ!"

—वि. श्री. क.



# क्रिकेटची बॅट

—कृ. वि. पेठे

'बॅट आणि बॉल' या पथिकाश्रमाचा चालक रीचर्ड नायरेन हा त्याच खेड्यातील क्रिकेट संघाचा कर्णधार होता आणि त्याच्या संघाने पंचवीसपेक्षा अधिक वेळा अखिल इंग्लंड संघाचा पराभव केला होता. त्यावेळेपासून क्रिकेटच्या खेळाचा जगातल्या निरनिराळ्या भागातून प्रसार झाला. इंग्लंडमधील असंख्य शहरातून आणि खेड्या-तून सूर्य-प्रकाशात पाचूप्रमाणे चमकणाऱ्या हिरवळी, पार्श्वभूमीवर पानानी डवरलेली वृक्षराजी, बॅटवर आपटलेल्या चेंडूचे आवाज, शुभ्र फ्लॅनेल्समध्ये वावरणाऱ्या खेळाडूंच्या हिरवळीवर लांबलांब होत चाललेल्या सावल्या अशा प्रकारची दृश्ये हे वसंत ऋतूतले एक वैशिष्ट्यच होऊन राहिले आहे.

हिरवळीच्या पाहणीपासून तो स्टम्प्स काढण्यापर्यंत सर्व गोष्टी शास्त्रशुद्ध आणि परंपरेनुसार करण्याचा खेळ म्हणजे क्रिकेट. क्रिकेटची बॅट तयार करण्याच्या कामीसुद्धा परंपरा आणि संस्कार यांचा भाग असतोच. बॅटीसाठी एका विशिष्ट प्रकारचेच लाकूड लागते आणि त्याची मूठही एका विशिष्ट प्रकारच्या वेताचीच लागते. फलंदाजाच्या हातात सहज खेळती राहील अशी बॅट बन-विण्यासाठी बॅटीच्या लाकडाकरिता झाड लावण्यापासून तो बॅटीला पॉलिश करण्यापर्यंत अनेक गोष्टी आवश्यक असतात. त्यापैकी बॅटी बनविण्याचा दीर्घ अनुभव आणि बॅट तयार करणाराचे कौशल्य याना फार महत्त्व असते.

उत्तम बॅट बनविण्यासाठी 'सॅलिक्स कॅरुली' नावाच्या झाडाच्या लाकडाचा उपयोग होतो. कोणत्याही तीव्र हवामानात हे झाड वाढत नसल्याने ब्रिटनमध्येच या झाडांची चांगली लागवड होऊ शकते. ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, वेस्ट इंडीज, भारत, पाकिस्तान, सीलोन, मलेशिया इत्यादि ठिकाणचे खेळाडू इंग्लंड-मधूनच आपापल्या बॅटी मागवितात त्याचे हेच कारण होय! सॅलीक्स कॅरुली हे झाड झपाट्याने वाढते आणि त्याची लागवड करणेही सोपे असते.

## झाडाच्या शोधाची कहाणी

या झाडाचा शोध मोठ्या गंमतीदार रीतीने लागला. एका शेतकऱ्याच्या बायकोने कपडे वाळत घालण्यासाठी दोरी बांधण्या-करिता एक झाड आणून पुरले. काही महिन्यातच त्याची वाढ झाली आणि बॅट तयार करण्यासाठी त्याच्या लाकडाचा ससेक्समधील ग्रे निकोल्स नावाच्या कंपनीने सहज उपयोग करून पाहिला, तर ते लाकूड बॅटीसाठी अप्रतिम असल्याचे आढळून आले. शंभरा-पेक्षाही अधिक वर्षे ग्रे निकोल्स ही कंपनी बॅटी तयार करीत आहे. हे झाड बारा वर्षात चाळीस फुटांपर्यंत वाढते. पण जमिनीपासूनचे पहिले पाच फूट सोडून त्यावरील दहा फुटांचा ओंडका बॅटीसाठी वापरता येतो. त्याचा घेर चार फुटांपेक्षा अधिक असावा लागतो. बॅटी तयार करण्यासाठी झाड पाडले म्हणजे सव्वादोन फुटापेक्षा थोडे अधिक असे त्याचे ओंडके करण्यात येतात आणि बॅटीची पात तयार होईल अशा फळ्या त्या तुकड्यातून काढण्यात येतात. फळ्या कापून झाल्यावर त्याना बॅटीचा ओबडधोबड आकार देण्यात येतो आणि त्यांचे ढीग करून ते उघड्यावर ठेवण्यात येतात. एका झाडापासून तीस ते चाळीस बॅटी तयार होतात.

अशा प्रकारे त्या फळ्या 'सीझण्ड' झाल्यावर बॅट तयार करण्याचे काम सुरू होते. प्रथम प्रत्येक फळीची नीट तपासणी होते. फळीला गाठी असल्या तर त्या कापण्यात येतात. इतर काही दोष असले तर तेही दूर करण्यात येतत. हे झाल्यानंतर त्या फळी-पासून कोणत्या आकाराची बॅट तयार करता येईल हे निश्चित करता येते. फळीचा बराच भाग कापावा लागला तर त्याची बॅट मुलांसाठी उपयोगी पडेल. बॅटीच्या लांबीच्या प्रमाणात तिची रुंदी नक्की कर-ण्यात येते. सर्वात अधिक आणि सर्वात कमी रुंदीमध्ये जास्तीतजास्त एक इंचाचाच फरक असतो. बॅटीची लांबी रुंदी नक्की झाली म्हणजे त्या फळीवर प्रत्येक चौरस इंचाला दोन हजार पौंड इतका दाब देण्यात येतो. त्यामुळे बॅटीचा पृष्ठभाग टणक होतो आणि चेंडूचा कितीही जोराचा फटका सहन करण्यास तो योग्य होतो. या दाबामुळे केव्हा केव्हा आपल्या साध्या दृष्टीला दिसणार नाहीत अशा चिराही पडतात. अशी फळी निरुपयोगी ठरते.

## बॅटीसाठी वेताची मूठ

बॅटीची मूठ वेताची असते. हा वेत पूर्व आशियातून आणण्यात येतो आणि त्याला 'सारावाक' वेत म्हणतात. हा वेत फार महाग तर असतोच आणि त्याचा बराच भाग फुकटही जातो. बॅटीच्या एका मुठीत वेताचे बारा तुकडे असतात. एक हंड्रेडवेट वजनाच्या वेतातून सुमारे चाळीस मुठी तयार करता येतात. बॅटीला मूठ बसविणे हे अतिशय कौशल्याचे आणि म्हणूनच फार कठीण काम असते. बॅटीच्या पातीमध्ये ही मूठ योग्य रीतीने बसविली म्हणजे ती इतकी घट्ट बसते की सरसाने ती चिकटविली नाही तरीसुद्धा ती ओढून काढता येत नाही. ग्रे निकोल्स कंपनीतल्याच एका कामगाराने अशीच एक बॅट स्थानिक सामन्यात खेळण्यासाठी नेली. सरसाने मूठ न चिकटविलेलीच बॅट त्याला चुकून देण्यात आली होती. त्या बॅटीने त्याने चौदा चौकार हाणून शंभरावर धावा केल्या पण मूठ जरासुद्धा ढिली झाली नव्हती.

अलीकडच्या उत्तम प्रकारच्या बॅटीच्या मुठीत एक पोलादी कमान (स्प्रिंग) आणि रबर बसविलेले असते. त्यामुळे चेंडूच्या फटक्याचा दणका ती बॅट सहन करू शकते. पोलादी कमानीमुळे दीर्घकाळ वापरल्यानंतरही मूठ वाकत नाही. बॅटीला अंतिम आकार देण्याचे काम फार कौशल्याचे असते. कुशल कारागीर ते हातानेच करतो. त्यासाठी रंधा आणि चाकूचे पाते यांचाच तो वापर करतो– आणि बॅटीला तोल आणून देतो. बॅटीचा आकार कायम झाल्यावर तिचा पृष्ठभाग घासून घासून गुळगुळीत करण्यात येतो आणि त्याला चकाकी आणण्यात येते. नंतर बॅटीची मूठ लेथवर लावून फिरविताना तिच्यावर फीत आणि दोरी गुंडाळण्यात येते. ती फिरविण्यासाठी लेथवर लावल्यामुळे पातीच्या तळाला बारीकसे छीद्र पडते. काही मुलाना वाटते त्याप्रमाणे ते तेल सोडण्यासाठी ठेवलेले छिद्र नसते.

बॅटी तयार होत असताना त्यांची वारंवार पाहणी–तपासणी होत असते आणि बॅट तयार झाल्यावर तज्ज्ञाकडून तपासून तिची वर्गवारी ठरविण्यात येते.

बॅटीची फटका मारण्याची शक्ती बॅटीच्या सर्वात जाड भागातील लाकडावर अवलंबून असते. अलीकडे काही बॅटी थोडयाशा उतरत्या खांद्याच्या करतात. त्यामुळे बॅटीचे वजन कमी होऊन खालच्या भागात लाकडाचा अधिक साठा राहू शकतो आणि फटक्याची गुणवत्ता वाढते. सुप्रसिद्ध ऑस्ट्रेलियन खेळाडू रीची बेनों याने एक नवी बॅट प्रचारात आणली आहे. तिची मूठ आखूड पण नेहमीपेक्षा थोडी जाड असते. डावखुऱ्या फलंदाजांसाठी खास बॅटी तयार करण्यात येतात. त्यांचा तळवा नेहेमीच्या विरुद्ध दिशेला घासण्यात येतो. पण अशा बॅटींचे उत्पादन फारच कमी प्रमाणात म्हणजे दर हजारी फक्त पाच या प्रमाणात करण्यात येते.

• • •










**शैलीदार लेखक म्हणून श्री. नेव्हिल कार्डस् याना क्रिकेट-जगतात गौरविले जाते. त्यांच्या मिस्किल शैलीचा हा रसिकला आविष्कार....**

# ऋतुराज




वसंत ऋतु सुरू झाला की माझ्या मनातील वसंत बहरून येतो आणि मी उत्साहाने चारी दिशाना नुसता भटकत सुटतो– केवळ क्रिकेट बघण्यासाठी ! क्रिकेटचा हा खेळ बघण्यासाठी मग मी कुठेही हुंदडतो. कोपऱ्यातील केन्टपासून तिकडे दूर ऑस्ट्रेलियापर्यंत. प्रफुल्लीत वृत्तीने हे असं क्रिकेट पाह्यचं आणि ऑगस्टमधील एका सुन्न दुपारी क्रिकेटचा त्या हंगामापुरता निरोप घ्यायचा! संध्या-समय समीप आलेला असतो, सूर्य उदास होऊन घरी निघालेला असतो– अगदी माझ्यासारखा! आमच्या उदासीनतेचं कारण एकच. उद्या आम्हाला घोघानाही क्रिकेट बघायला मिळणार नाही. उद्या आमची दारुण निराशा होणार आहे. आजचा सामना हा शेवटचा सामना होता. त्या तिन्हीसांजी मी भांबावून उभा होतो–पक्ष्यांच्या थव्याकडे कलती मान करून! अजून आठवतोय् केन्टमधील तो दिवस......त्या दिवशी वूलीला आम्ही त्याच्या विजिगीषु सामर्थ्यानिशी पाहिला होता. त्याच्या जोरकस शतकातील प्रत्येक घाव नजरेत सामावली होती. फलंदाजीच्या करामतीमुळे प्रेक्षकांवर त्याने अशी विलक्षण मोहिनी घातली होती की जो तो दिङमुढ होऊन चिडीचीप बसला होता. टाळ्या पिटण्याचंही त्याना भान राहिलं नव्हतं. कौतुकाचे बोल उच्चारायलाही ते विसरले होते. नुसती धुंदी. धुंदीत मश्गूल झाले होते ते! प्रेक्षकच काय पण आकाशातील ढगही वूलीचा खेळ पाहून वेडावले होते. मार्गस्थ होण्याऐवजी ते क्षणभर विसावले होते. परमेश्वराने हेवा करावा असं विलक्षण दृश्य होतं ते. पण संपलं, संगळं संपलं. संध्या–छायेत ह्या क्रीडांगणावर मी एकटा उभा आहे. 'वसंत ऋतु केव्हाच गेला.' मी विचार करू लागलो, 'जाऊ दे. परंतु क्रिकेटशिवाय इथला कुठलाच वसंत ऋतु बहरणार नाही हेही निश्चित.'

क्रिकेटचा खेळ बघण्यासाठी प्रत्येक इंग्लिश माणसाला घराघरातून पाठ दिले जातात. प्रत्येक ऋतूचा रंग बदलत जातो आणि ह्या बदलत्या रंगाचं दर्शन मला क्रिकेटच्या खेळाची आठवण करून देतं. वसंतराज सृष्टीवर अवतरला की क्रिकेटपटू ऐन उमेदीत असतात. उत्साहाने नुसते ओथंबलेले असतात. त्यांच्या आशाआकांक्षांची कळी अशी उमलते! नव्या कोऱ्या बॅटस् आणि सळसळत्या विजारी-सगळा अगदी उतावीळपणा, वैशाखातील हवेत असतो तसा! वैशाखी पावसाचे शिडकाव खेळाडूंची तारांबळ उडवतात. पण पॅव्हिलियनमध्ये ते पोचत नाहीत तोच तो वाकुल्या दाखवीत निघून जातो. खेळाडू पुन्हा लगबगीने क्रीडांगणावर परततात. क्रीडांगणावरील गवताचं प्रत्येक पातं उन्हात मोत्यासारखं चमकत असतं. त्या दृश्याने खेळाडू मोहीत होतो, त्याप्रमाणे स्वतःही खेळात चमकायला बघतो! वसंत ऋतूत सुरू होणारी अशी ही क्रिकेटची नांदी माझ्या मनाला खूप सुखावते. ऋतु तसा फार नाजुक असतो. त्याचं आगमन जाणवतं पण गमन कळत नाही. त्याचं रेंगाळणं नव्या नवरीच्या नाजुक पदक्षेपांनी चालू असतं, दाणदाण नव्हे! तो आपल्यावर उसळून येत नाही– फुटबॉल यावा तसा! पदक्षेप जितका नाजुक तितकाच विनयशील. युगायुगांपासून दर वर्षी हा ऋतु नेमाने येतोय् पण कधीही आपले हे गुण विसरून येत नाही.

ग्रीष्माचं आगमन होतं तेव्हा क्रिकेट चांगलं बहरलेलं असतं– बागेतील फुलझाडं ज्याप्रमाण आता बहरलेली असतात त्याप्रमाणे! खेळाने आता अजिंक्य मुकुट चढविलेला असतो. खेळ अगदी शिगेला पोहचतो. लहानशा खेड्यापासून लंडन शहरापर्यंत प्रत्येक क्रीडांगणाने शुभ्र वस्त्र परिधान केलेलं असतं. क्रीडांगणे तापलेली असतात, खेळाडूंचं रक्तही तापलेलं असतं.! लॉर्डस्‌वर खेळणारे फलंदाज शतकांची मिरासदारी बाळगून खेळत असतात पण दूर कुठेतरी खेड्यातही एखादा 'हॉब्स्' नेत्रदीपक फटके मारीत असतो. गोलंदाजही धुंदीने मस्त झालेले असतात. गोलंदाजी करताना दातांचा असा आक्राळविक्राळ आवाज करतात की भुईवर गडगडाट होतोय् की काय असा क्षणभर भास व्हावा. यांची नजर इतकी धुंदावलेली असते की त्या नजरेला फक्त मधला स्टंपच् तेवढा दिसत असतो; आणि जेव्हा 'विकेट' पडते तेव्हा 'डीप'कडे क्षेत्ररक्षण करीत असलेले खेळाडू ताण सहन न होऊन हिरवळीवर क्षणभर विसावतात, निळ्या आकाशाकडे दृष्टी लावून सुटकेचा श्वास सोडतात. आता क्रिकेटपटूच्या नवनवोन्मेषाची वेळ आली, जून संपून जुलै सुरू झाला ! आता येणाऱ्या प्रत्येक क्षणी तो प्रफुल्लीत असतो. इतकं मुसमुसलेलं तारुण्य त्याला क्वचितच् अनुभवाला मिळतं.

## क्रिकेट मोसम संपला की फुटबॉल सुरू

ऑगस्ट उजाडतो आणि क्रिकेटमधील टवटवीतपणा कोमेजतो. खेळात मुळी म्हणजे मुळीच उत्साह रहात नाही. क्रिकेटपटू अकाली प्रौढ होऊ लागतात तो समय हाच ! पौणिमेनंतर चंद्र जसा क्षीण होत जातो तसं काहीसं हे वाटतं. इतकं असूनही हंगाम आपली शालीनता विसरत नाही. त्याच्या उत्साहाला जराही तडा गेलेला नसतो कारण क्रिकेटपटूनंतर फुटबॉलपटूंचं स्वागत करायला तो आता तयार असतो! पण एवढं मात्र खरं की सरत्या ऑगस्टमधील त्या काळोख्या रात्री क्रिकेटपटू एकामागून एक अस्तंगत होत असतात. हार्दिक शुभेच्छा हवेत लकेरतात. जो तो आपला तंबू गुंडाळून निरोप घेण्याच्या तयारीत असतो पण त्याना निरोप द्यायला असतो कोण? ते उत्साहशील कोटी कोटी रसिक कुठे गेले? ते गेले त्या मोठ्ठ्या चेंडूचं (फुटबॉलचं) कौतुक करायला! आणि इकडे निरोपाच्या वेळी मात्र कोणीच नाही, अगदी कोणीच नाही! ह्या हताश अवस्थेत जेव्हा क्रिकेटपटूना क्रीडांगण सोडावं लागतं तेव्हा प्रथमच त्याना त्रास लागते त्यांच्या कौटुंबिक जीवनाची! इतके दिवस जगले ते कितीही झालं तरी लौकिक जीवन. घरी जाता जाताही क्रिकेट-वरील प्रेमाने तो घोटाळतो. हळूच क्रीडांगणावर शेवटचा कटाक्ष तो टाकतोच! पुढल्या वर्षी उन्हाळा अगदी लवकर येईल असं त्याला मनोमन उगीच वाटत असतं; म्हणजेच आपण क्रिकेट खेळायला पुन्हा लवकर इथे येऊ, ही हुरहूर त्याला सुखवीत असते.

ऋतुराजाची करामत जाणणं ही एक कौशल्यपूर्ण गोष्ट आहे आणि तितकंच क्रिकेटचा सामना बघणं ही सुद्धा एक कौशल्यपूर्ण करामत आहे. एकटक नजरेने आपण तो सामना बघत असतो—इतकी-सुद्धा दृष्टी काढायला आपण तयार नसतो. न जाणो त्या गाफीलक्षणी नेमकं काहीतरी विपरीत घडेल आणि ते बघायला आपण नेमके मुकू—केवळ हीच भीती आपल्याला वेधक नजरेने तो सामना बघायला लावते. आणि ही नजर हपापलेली असते नेत्रदीपक खेळासाठी पण प्रत्यक्षात बघायला मिळतो तो मात्र कंटाळवाणा खेळ. कधी कधी रटाळही! अशावेळी एखादा नेत्रदीपक फटका खेळात केवढं चैतन्य निर्माण करून जातो. तो पाहून मन टवटवीत होतं, भर उन्हाळ्यात अचानक येणाऱ्या वाऱ्याच्या झुळकेनं होतं तसं. पण हे क्वचित घडतं. अलिकडे तर खेळ फारच निष्प्रभ होत चाललाय्. इतका की खेळ पाहण्याऐवजी आपण खुर्चीत रेलून पडलेलो असतो. तोंडात पाईप आणि मधून मधून शेजाऱ्याशी गप्पा मारण्यात आपण दंग असतो.खेळ चालूच असतो! क्रिकेटचे सामने पाहून काळाचे पांढरे झालेले प्रेक्षक वडबडत असतात, 'आमच्या वेळी प्रत्येक चेंडू ठोकला जात असे...!'

## श्वास रोखून धरणारा झेल

इतक्यात एक बेसावध फटका, एक लक्ष्यवेधी चेंडू, एक सुंदर झेल आणि प्रेक्षक धुंदीतून खडबडून जागे होतात. टाळ्यांचा नुसता कडकडाट होतो. पुन्हा चैतन्य दरवळतं. मग स्मृतीत रेंगाळू लागतात झेल सोडल्यामुळे गमवावे लागलेले चांगले सामने. कितीतरी झेल! पण सहनशक्तीची कमाल असते ती 'लाँग–ऑन'ला उभ्या असलेल्या क्षेत्ररक्षकाची. त्याच्याकडे आकाशातून उंचावरून चेंडू येत असतो. वेधक नजरेने चेंडू खाली येण्याची तो वाट पहात असतो. एकाकीपणे! खेळाडू, अंपायर्स, प्रेक्षक सगळे त्याच्याकडे श्वास रोखून बघत असतात; आणि इतक्यात कोणीतरी किंचाळतं – "सोडणार बघा तो झेल, नक्कीच सोडणार!" काही वर्षांपूर्वी आस्ट्रेलियात इंग्लंडविरुद्ध झालेला कसोटी सामना आठवतो. ऑस्ट्रेलियाचे क्लेम हिल व व्हिक्टर ट्रंपर अशी धडाकेबंद फलंदाजी करीत होते की धावांचा डोंगर पाहून इंग्लंड हबकून गेले. हे दोन श्रेष्ठ फलंदाज लवकर बाद होण्याचे चिन्ह दिसत नव्हते. तास न् तास खेळत होते पण प्रत्येक फटका अचूक होता. इंग्लिश गोलंदाजांचा धुव्वा उडत होता. पण तरीही विल्फ्रेड ऱ्होडस् नेटाने गोलंदाजी करीत होता. 'डीप'मध्ये कधीतरी झेल उडेल ही भावना त्याला चेतवीत होती; आणि ऱ्होडस्चं भाकीत खरं ठरलं! हिलने एक जोराचा फटका मारला पण चेंडू आकाशात उंच उडाला व ए. ई. नाईट जिथे क्षेत्ररक्षण करीत होता त्या बाजूने तो खाली येऊ लागला. सगळ्यांचे डोळे नाईटवर रोखले गेले. एक सेकंद सगळ्यांचे श्वासही बंद पडले! चेंडू आता खाली येत होता, नाईट चुळबुळ करीत होता. 'सोडणार हो' असे शब्द उमटले, पण नाईटने तो झेल पकडला आणि एकदम गुडघे दुमडून तो खाली बसला. त्याने मान तुकवली. त्याच्या सहकाऱ्यांना वाटलं नाईटवर ताण पडून त्याची तब्येत बिघडलेली दिसते आहे. ते त्याच्याभोवती जमले. "काय झालं? काय झालं?" परंतु नाईट एकाएकी ताठ उभा राहिला व आवंढा गिळून म्हणाला, "मित्रहो, काही झालं नाही. I was only thanking my Maker." क्रिकेट मनुष्यावर केवढा पगडा बसवतं.

(पहा: Responsibility can weigh down the strongest.)

## क्रिकेट नसतं तर ?

मला कधीकधी असं वाटतं की इंग्लंडमध्ये क्रिकेट नसतं तर? छे, हा विचार सहनही होत नाही. इंग्लंडमध्ये क्रिकेट इतकं मुरलेलं आहे की क्रिकेटशिवाय इंग्लंडमधील सगळं नाहीसं झालं तरी एकटा क्रिकेटचा खेळ पाहून इंग्लंडची परत पुनर्वसाहत करता येईल! इंग्लिश भाषेशीही क्रिकेट चांगलंच निगडीत झालं आहे. जिथे इंग्रजी बोललं जात नाही तिथे अस्सल क्रिकेटही खेळलं जात नाही! म्हणूनच अमेरिकनाना हा खेळ खेळणं जमलं नाही. इंग्लंडमधील प्रत्येक खेड्यात चर्चची ज्या कसोशीने उभारणी केली जाते त्याच कसोशीने क्रिकेटसाठी मैदान तयार केलं जातं. इंग्लंडमध्ये जन्मलेल्या प्रत्येकाला लहानपणीच 'क्रिकेटचा सामना म्हणजे काय?' ह्याची अंधुक कल्पना असते. क्रिकेटचा सामना चालू असताना इंग्लिश माणूस कितीही घाईगर्दीत असला तरी क्षणभर थांबून मैदानात डोकावणारच! इतकंच काय पण प्रवास करतानासुद्धा तो गाडीच्या खिडकीतून बाहेर डोकावत असतो, ते एकाच कारणासाठी कुठेही बाहेर उजाड माळरानात क्रिकेटचा खेळ चालू असेल तर तेवढाच तो बघायला

(पान ३७ वर पहा)














अंपायरनेच 'हाऊ इज दॅट' अपील केले आणि निर्णय कोणी दिला ?

# हाऊ इज् दॅट

प्रत्येक अंपायरला क्रिकेटच्या खेळात एका फार मोठ्या संकटाला तोंड द्यावे लागते. ते म्हणजे गोलंदाजाने केलेले 'अपील !' कोणतीही डिक्शनरी घ्या, त्यात 'अपील' या शब्दाचा अर्थ 'अत्यंत कळकळीची विनंती' असा सापडेल. परंतु क्रिकेटच्या जगतात मात्र तो अगदीच वेगळा असल्याचे दिसते. 'हाऊ इज् दॅट्?' असे अंपायरला खेकसून विचारणारा गोलंदाज कळकळीची विनंती तर मुळीच करीत नसतो उलट तो त्या अंपायरला जणू काही चक्क धमकावीतच असतो. खरं म्हणजे तो म्हणत असतो–"अरे काय बनवलंय फलंदाजाला! नुसता बघतोस काय, बऱ्या बोलानं बोट वर कर!" गोलंदाजाची 'अपील' करण्याची पद्धत मात्र वेगळी असते.

फरेडी टरुमन विजेचा झटका बसल्याप्रमाणे हवेत उडतो आणि हातपाय झाडीत आकाशपाताळ एक करणारी गर्जना करतो. जणू काही त्याची अपेक्षा असते की निदान घाबरून तरी अंपायरने बोट वर करावे. उलट रीची बेनॉंचा अशा प्रकारच्या आरडाओरडीवर मुळीच विश्वास नव्हता. न्यायाधीशाने आरोपीकडे बोट रोखून अत्यंत गंभीर आरोप करावा त्या थाटात तो अंपायरच्या छातीवर बोट रोखून अत्यंत नाटचमयरीत्या 'अपील' करीत असे. टोनी लॉक तर जणू अंपायरला किमतच देत नाही. आकाशाकडे हात पसरून तो 'अपील' करतो–जणू काही परमेश्वराला ! त्याला म्हणायचे असते– "परमेश्वरा! आता तूच पहा, ह्या फलंदाजाने तंगडी मध्ये घातली नसती तर बरोबर मधली दांडीच उडाली असती. पण फलंदाज पायचीत झाल्याची सरळ साधी गोष्ट ह्या अंपायरला कशी कळत नाही?" मात्र 'टिच्' फ्रिमनला वर सांगितलेली कोणतीच पद्धत पसंत नाही. फलंदाजाच्या पॅड्स्वर चेंडू आदळला की तो भरल्या गळ्याने केविलवाण्या सुरात अंपायरला विचारी "या खेपेला तरी आशा आहे का ? "

## अंपायरवरील दुहेरी संकट

दिवसभर कमरेत वाकून उभ्या रहाणाऱ्या अंपायरचे हे संकट एवढ्यावरच नाही संपत. तर कधी कधी त्याला 'दुहेरी अपीला'ला तोंड द्यावे लागते. ती त्याची कसोटीच असते म्हणाना!

लँकेशायरचा किंग सरेच्या स्क्विअर्सची गोलंदाजी खेळत होता. एक चेंडू त्याच्या पायाला लागल्यावर 'अपील' करण्यात आले. पण एक चेंडू बॅटीला लागून गेल्यामुळे अंपायरने त्याला नकार दिला. पण तो चेंडू पॅडस्वरून स्लीपमधील खेळाडूच्या हातात गेला होता. त्याने लगेच झेलबादासाठी 'अपील' केले आणि काही क्षणापूर्वीच नाबाद सांगितलेल्या फलंदाजाला बाद ठरवावे लागले.

बिल् ओरिलीच्या गोलंदाजीवर व्हॅलेंटाईन खेळत होता. यष्टीमागे घेतलेल्या झेलाबद्दल सर्व ऑस्ट्रेलियन खेळाडूंनी जोरदार 'अपील' केले. पण चेंडू बॅटला न लागता पॅड्सला स्पर्श करून गेला होता. अंपायरने निर्णय दिला– "आऊट, पण झेलबाद नाही तर पायचीत ! "

१९३८ सालच्या पहिल्या कसोटी सामन्यातील गोष्ट आहे. डॉन ब्रॅडमन हा ऑफ् स्पिनर रेग सिन्फिल्डचा एक चेंडू पुढे होऊन खेळायला गेला पण चेंडू त्याच्या बॅटीजवळून गेला. यष्टीरक्षक लेस्ली एम्सने बेल्स उडविल्या व लेग अंपायरकडे 'अपील' केले. पण त्याने नकार दिल्यावर परॅक चेस्टर ह्या गोलंदाजाकडील अंपायरकडे 'अपील' केले. चेस्टरने सांगितले. " आऊट, पण झेलबाद." ब्रॅडमनच्या बॅटीचा अतिशय सूक्ष्म स्पर्श चेंडूला झाला होता.

म्हणूनच अंपायरला प्रत्येक चेंडूचे काळजीपूर्वक निरीक्षण करावे लागते आणि प्रत्येक अपीलावर विचारपूर्वक निर्णय द्यावा लागतो. फलंदाज, गोलंदाज किंवा क्षेत्ररक्षक यांनी केलेल्या चुकांवर त्यांच्या बाजूने जोरदार समर्थन करण्यात येते. फार काय कर्णधाराने केलेल्या घोडचुका सुद्धा उदार अंतःकरणाने पोटात घातल्या जातात. पण अंपायरची एखादीच सुद्धा चूक त्याच्या नाशाला कारणीभूत होते. चुका करण्याचा हक्क एक अंपायर सोडून बाकी सर्वांना असतो. जणू काही अंपायर हा माणूस नसतोच! एका टीकाकाराने तर चक्क म्हटलेच आहे– "चुका करणे हा मनुष्यधर्म आहे, परंतु अंपायर म्हणजे काय मनुष्य नव्हे ? "

अशा रीतीने अतिशय काळजीपूर्वक विचार करूनच फलंदाज बाद की नाबाद हे अंपायरला ठरवावे लागते. परंतु कधीकधी अंपायरच्या न कळत किंवा चुकून त्याचे लक्ष नसताना जर फलंदाज संशयास्पद रीतीने बाद झाला तर ज्याप्रमाणे एकाद्या खटल्यात संशयाचा फायदा मिळून आरोपी निर्दोष सुटतो त्याप्रमाणे फलंदाजाला संशयाचा फायदा मिळतो आणि अंपायरला त्या फलंदाजाला नाबाद ठरवावे लागते.



अनुक्रमणिका

**खेळाडूंना संशयाचा फायदा**

ऑस्ट्रेलिया–वेस्ट इंडीज कसोटी सामन्यात वॉली ग्राऊटने व्हॅलेंटाईनचा एक चेंडू 'कट' केला. चेंडू यष्टीरक्षक व स्लीपमधील खेळाडूंच्या मधून गेला त्यामुळे ग्राऊटने धावण्यास सुरवात केली. पण तेवढ्यात यष्टीरक्षक अलेक्झांडरने यष्टीवरून खाली पडलेली बेल् दाखवीत अंपायरकडे 'अपील' केले. पण अंपायर अर्थात चेंडूकडे पहात होता व त्याचे बेल्सकडे लक्ष नव्हते. बेल् कशी पडली हे न कळल्याने अंपायरने ग्राऊटला नाबाद ठरविले.

अशीच एक गोष्ट इंग्लंड–ऑस्ट्रेलिया यांच्या कसोटी सामन्यात झाली. फरेडी ट्रुमनने कॉलीन् मॅकडोनल्डला एक आखूड टप्प्याचा चेंडू टाकला. त्याने तो बऱ्याच मागे यष्टीच्या जवळ येऊन ' फाईन लेग 'ला वळविला. तेथे उभ्या असलेल्या खेळाडूने तो अडवून परत यष्टीरक्षकाकडे फेकला. तेवढ्यात जमिनीवर पडलेल्या बेल्-कडे त्याचे लक्ष गेले. इतकेच नव्हे तर यष्टीच्या बुंध्यापाशी बुटाची खूणसुद्धा होती. पण अंपायरने स्वतः बेल पडलेली न पाहिल्याने मॅक्डोनल्डला संशयाचा फायदा मिळाला.

एका कसोटी सामन्यात मॅक्डोनल्ड जखमी झाल्याने ' रनर ' घेऊन खेळत होता. त्याने एक चेंडू मारला व धाव घेण्यासाठी ' कॉल ' दिला. सुरुवातीला त्याचा 'रनर' व दुसरा फलंदाज जरा गोंधळले तरी शेवटी ते धावलेच. पण चुकून मॅक्इन्स हा अंपायर यष्टीच्या चुकीच्या बाजूला जाऊन उभा राहिला. आणि खेळाडूने अचूक फेक करून यष्टी पाडली हे अंपायरने पाहिले पण मॅक्डोनल्डच्या 'रनर'ने अंपायरच्या पाठीमागून धाव पूर्ण केली. एकटा तो अंपायर सोडला तर सर्वांना माहीत होते की धाव पूर्ण झाली नाही आणि मॅक्डोनल्ड बाद झाला आहे. पण दुर्दैवाने अंपायरने हे न पाहिल्याने त्याने मॅक्डोनल्डला नाबाद ठरविले.

पण या 'अपील' करण्याच्या सवयीमुळे सर्वांत गम्मत जर कोणाची येत असेल तर ती यष्टीरक्षकाची! या यष्टीरक्षकांना 'अपील' करण्याची इतकी सवय झालेली असते की कधीकधी यष्टी-रक्षण करीत नसताना सुद्धा ते संवयीमुळे अपील करतात— त्यांच्या अगदी न कळत!

इंग्लंडचा यष्टीरक्षक लेस्ली एम्स एका कसोटी सामन्यात फलंदाजी करीत होता. त्याच्या जोडीदाराचा जेव्हा यष्टीरक्षकाने झेल घेतला तेव्हा एम्सने अतिशय जोरात 'अपील' केले. त्यावेळेस अंपायरने त्याला विचारले– "अरे, तू का 'अपील' करतोस? " तेव्हा आश्चर्याने त्यानेच उलट विचारले-"मी अपील केलं?" सवयी-मुळे अगदी न कळत त्याने अपील केले.

ग्लूस्टरशायरचा यष्टीरक्षक जॅक बोर्ड हा नुकताच अंपायर झाला होता. त्याच्या त्या पहिल्या 'सिझन' मधल्या एका सामन्यातील गोष्ट आहे. यष्टीमागे घेतलेल्या एका झेलबद्दल त्याने स्वतःच जोरात 'अपील' केले आणि लगेच बोट वर करून फलंदाज बाद हाही निर्णय दिला.

**अंपायरचे अपील नि गोलंदाजाचा निर्णय**

इंग्लंडचा प्रसिद्ध अंपायर बिल् रीव्हज् इसेक्सकडून एम्.सी.सी. संघाविरुद्ध गोलंदाजी करीत होता व नॉटिंगहॅम्पशायरचा गोलंदाज टॉमी ओट्स अंपायर होता. रीव्हज्चा एक चेंडू फलंदाजाच्या बॅटीला स्पर्श करून यष्टीरक्षकाच्या हातात गेला. त्याबरोबर नेहमीच्या सवयीने ओट्सने ' हाऊ इज् दॅट ? ' म्हणून अपील केले आणि क्षणाचाही विलंब न करता रीव्हज्ने बोट वर केले. आणि फलंदाजसुद्धा तंबूत परतला – अगदी समाधानपूर्वक!

शेवटी एका न केलेल्या–आणि म्हणूनच गाजलेल्या–अपीलाची गोष्ट! हे 'कधीही न केले गेलेले अपील' ( The appeal which was never made ) म्हणून प्रसिद्ध आहे.

१९२६ सालच्या इंग्लंड व ऑस्ट्रेलिया यांच्यातील पाचव्या कसोटी सामन्यातील ही गोष्ट आहे. आधीचे चारही कसोटी सामने अनिर्णित झाल्यामुळे या सामन्यावरच 'अॅशेस'चे भवितव्य अवलंबून होते. ऑस्ट्रेलियाला पहिल्या डावात बावीस धावांची आघाडी मिळाली होती. इंग्लंडने आपला दुसरा डाव सुरू केला. हॉब्ज व सट-क्लिफ फलंदाजीस आले. पण खेळपट्टी अतिशय खराब झाल्याने ऑस्ट्रेलियन कर्णधार कॉलीन्स याने द्रुतगती गोलंदाजांऐवजी आपल्या फिरक्या गोलंदाजाना डावाची सुरूवात करण्यासाठी चेंडू दिला. ऑर्थर मेलीने पहिले षटक हॉब्जला टाकण्यास सुरवात केली. पहिलाच चेंडू डाव्या यष्टीच्या बाहेर पडून आत आला आणि उजव्या यष्टीच्या अगदी जवळून गेला. हॉब्ज थोडक्यात बचावला! दुसरा चेंडू गुगली होता आणि हॉब्जच्या पॅड्सवर आदळला. चेंडू उजव्या यष्टीवर पडला होता आणि मधली दांडी नक्की उडाली असती. आता सर्व ऑस्ट्रेलियन खेळाडूंकडून अतिशय जोरदार 'अपील ' होणार म्हणून अंपायर फ्रँक चेस्टर तयारीतच होता. इतकंच काय पण त्याने खिशा-तून हातसुद्धा बाहेर काढला होता. आता 'अपील' झाले की बोट वर करायचं! पण आश्चर्याची गोष्ट, इतर खेळाडू तर राहोच पण मेली किंवा ओल्डफिल्ड यानेसुद्धा 'अपील' केले नाही. आणि त्यामुळे कोणाच्या न कळत गुपचूप आपला हात परत खिशात घालताना मात्र चेस्टरची अतिशय तारांबळ उडाली. इकडे काहीही न झाल्या-प्रमाणे खेळ परत सुरू झाला. हे 'अपील' जर केले असते व हॉब्ज शून्यावर बाद झाला असता तर कदाचित् ऑस्ट्रेलियाने हा सामना जिंकला असता व ' अॅशेस ' मिळवल्या असत्या. पण शून्यावर बाद झालेल्या हॉब्जने आपले शतक पूर्ण केले, त्यामुळे इंग्लंडने तो सामना जिंकला व ' अॅशेस पुन्हा मिळविल्या!

अशा आहेत या 'अपीलां'च्या गमती जमती–काही केलेल्या व एका न केलेल्या! ● ● ●

**सुधीर कर्णेकर**

(पान ३५ वरून–ऋतुराज क्रिकेट)

मिळावा! क्रिकेटने इंग्लिश माणसाला नादावलं आहे ते असं! आता क्रिकेट पाच-सहा देशात खेळलं जातं पण क्रिकेटचं माहेर इंग्लंडच. माहेरी ह्या खेळाला जी शान लाभते ती इतरत्र नाही. ह्या खेळाचा अजिंक्य खेळाडू म्हणून केव्हाही इंग्लंडच्या डब्ल्यू. जी. ग्रेसचं महत्त्व नाकारता येणार नाही. ग्रेस गेला तरी क्रिकेट आहे आणि क्रिकेट आहे म्हणून ग्रेस अमर आहे ! क्रिकेटसाठी ग्रेसने काय केलं नाही? पदोपदी तो क्रिकेटचा ध्यास घेत होता. क्रिकेटला अस्सल इंग्लिश वैभव त्यानेच प्राप्त करून दिलं.

आज इंग्लंडात किताबतीचा जमाना सुरू झाला आहे. ग्रेस आज असता तर त्याला 'सर' ही किताबत नक्कीच लाभली असती. परंतु 'सर डब्ल्यू. जी. ग्रेस' ही कल्पनाच विनोदी आहे. अहो, ग्रेस ही एक संस्था होती तेव्हा किताबतीला अर्थ प्राप्त झाला असता— Sir Cricket ! ● ● ●








शतकांचा बादशाह

# कॉलीन काऊड्रे

—सुधीर वैद्य

क्रिकेटच्या खेळातील विविध क्षेत्रांत निरनिराळ्या क्रिकेटपटूंनी आपल्या नावीन्यपूर्ण कर्तृत्वाने तऱ्हेतऱ्हेचे विक्रम केले आहेत. जॅक हॉब्ज ह्याने १९७ शतके फडकावून शतकांचा विक्रम केला आहे, डॉन ब्रॅडमन तर धावा काढण्याचे यंत्र म्हणून ओळखला जातो. फरेडी टरुमन याने कसोटी सामन्यात ३०७ गडी बाद करण्याचा उच्चांक गांठला आहे, तर गॅरी सोबर्स आज बॅटिंग व बोलींगमध्ये अजोड असे प्राविण्य मिळवून 'झाले बहु, होतील बहु, आहेतही बहु परंतु यासम हा' होऊ पहात आहे. अशा तऱ्हेने क्रिकेटपटूंनी मैदान गाजवून आपले नाव सुवर्णाक्षरानी लिहून ठेवले आहे, पण इंग्लंडचा कप्तान कोलीन कौड्री ह्याने ऑस्ट्रेलियाविरुद्ध नुकतीच संपलेली कसोटी सामन्यांची मालिका जमेस धरून असे दिसून येईल की, त्याने केलेले अनेक जागतिक विक्रम शतकांच्या प्रमाणात आहेत. कसोटी सामन्यांच्या नव्वद वर्षांच्या इतिहासात कधीही न झालेले व झालेले, होते ते सर्व उच्चांक मोडून त्याने नवीनच विक्रम प्रस्थापित केले आहेत व तेही सारे त्याच्या केवळ चौदा वर्षांच्या क्रिकेट कारकीर्दीत. १९५४ ते १९६८ या कालखंडात सातत्याने खेळून आपल्या खेळातील कौशल्यास जराही धक्का न लावता फॉर्म टिकविला आणि कसोटी सामन्यांची शंभरी ओलांडली. कौड्रीला बहुतेक सामान्य संख्या माहीतच नसाव्यात. तो फक्त शतकांचीच परिभाषा जाणत असावा. शंभरावा कसोटी सामना त्याने शतक फडकावूनच साजरा केला. कसोटी सामन्यात पकडलेल्या झेलांचे शतक त्याने दोन वर्षांपूर्वीच गाठले होते. प्रथम दर्जाच्या सामन्यातील शतकांचे शतकही तो एक दोन वर्षात सहज पुरे करू शकेल. गेल्या मोसमातील धावा जमेस धरून त्याची एकूण ८१ शतके झाली आहेत. शतकांच्या शतकाचा उंबरठा तो लवकरच ओलांडील आणि क्रिकेटमध्ये आपले नाव 'शतकांचा' बादशहा म्हणून अजरामर करून ठेवणार हे निश्चित.

कौड्रीने आज क्रिकेटमध्ये जे असामान्य स्थान मिळविले आहे ते तो मिळविणारच असे जन्मत:च निश्चित झाले होते. जन्मक्षणी एखाद्याचे भविष्य ठरणे हे मानव इतिहासातील एकमेव उदाहरण म्हणता येईल. त्याचे भवितव्य कोणा एका ज्योतिषाने वर्तविले नव्हते तर ते त्याच्याच वडिलांनी ठरविले होते, आखून दिले होते.

**नावाची आद्याक्षरे 'एम्. सी. सी.'**

कौड्रीचे वडील दक्षिण भारतांतील चहाच्या मळ्याचे मालक असल्याने त्यांचे अनेक वर्षे भारतात वास्तव्य होते. १९२६–२७ मध्ये भारतात आलेल्या गिलिगनच्या संघाविरुद्ध युरोपियन संघातर्फे मद्रास येथील एका सामन्यात त्यानी ४८ धावांचा उच्चांक केला होता. एक उत्कृष्ट फलंदाज म्हणून ते ओळखले जात होते. आईलाही क्रिकेटचा खेळ आवडे. मग झालेच! आपल्या चिरंजीवानीही क्रिकेट खेळून त्यात प्राविण्य मिळवावे अशी दोघांचीही उत्कट इच्छा होती. दोघानीही एकमत करून २४ डिसेंबर १९३२ रोजी त्याना झालेल्या अपत्याचे नाव त्यानी मायकेल कोलीन कौड्री असे ठेवून, M. C. C. ह्या ख्यातनाम सर्वोच्च मध्यवर्ती क्रिकेट संघटनेच्या आद्याक्षरांशी मिळती जुळती आद्याक्षरे होतील अशा पद्धतीने नाव ठेवून कोलीन कौड्रीचा जन्मापासूनच क्रिकेटशी घनिष्ट संबंध जुळविण्याचा प्रयत्न केला.

कौड्रीने आयुष्यभर क्रिकेट खेळावे असे भवितव्य त्याच्या आईवडिलानी जन्मावरोबरच ठरविले. कौड्रीचा जन्म क्रिकेट खेळण्यासाठी आहे असे २४ डिसेंबर १९३२ रोजी निश्चित झाले होते. याहीपेक्षा आश्चर्यकारक गोष्ट म्हणजे एवढ्या लहानपणी आखून दिलेला मार्ग कोलीन कौड्री गेली ३६ वर्षे यशस्वीरीत्या आक्रमीत आहे, एवढेच नव्हे तर क्रिकेटमध्ये त्याने अढळ स्थान मिळविले आहे. मातापित्यांच्या अपेक्षेप्रमाणे कोलीन सातत्याने क्रिकेट खेळत आहे. प्रत्येक मुलगा आपल्या आईवडिलांच्या आकांक्षा पुऱ्या करतोच असे नाही, पण कोलीन मात्र त्या तंतोतंतपणे पुऱ्या करीत आला आहे. त्याला क्रिकेट खेळण्याची कला खरोखरीच अवगत आहे.

वयाच्या साडेपाच वर्षेपर्यंत तो वडिलांजवळ बंगलोरलाच राहिला. तो तेथे वडील आणि घरगड्यांसमवेत क्रिकेट खेळे. M.C.C. ह्या आद्याक्षरांचे नाव ठेवून कोलीन मोठा क्रिकेटपटू व्हावा एवढी इच्छा प्रकट करून वडील स्वस्थ बसले नाहीत, तर त्यानी तो मोठा होत गेल्यावर त्याला टेनिस कोर्टवर क्रिकेटचे धडे देण्यास सुरुवात केली व त्याच्या क्रिकेटचा पाया रचला.

सहाव्या वर्षी कोलीनला एकटयालाच इंग्लंडला पाठविले

व Tonbridge ह्या सुप्रसिद्ध शाळेत घातले. ह्या शाळेत अभ्यासाबरोबरच आठवडयातील चार दिवस हेडमास्तरांकरवी क्रिकेटच्या तंत्राचे शिक्षण दिले जाई, दोन दिवस सामने होत असत व रविवारी संपूर्ण विश्रांती असे. पहिल्या वर्षी क्रिकेटचे एवढे ज्ञान त्याला पुरे झाले. त्याने पुढल्याच वर्षी आंतरशालेय सामन्यात ९३ धावा काढून जॅक हॉब्ज बॅट बक्षीस मिळविली. त्याचा खेळ पाहून एका रसिकाने त्याला अभिनंदनपर पत्र पाठून प्रोत्साहन दिले. क्रीडांगणावर मोठमोठे पराक्रम करण्याची महत्वाकांक्षा वाढविण्यास हे पत्र इतके प्रभावशाली ठरले की ते पत्र त्याच्या शय्यागृहात परेम-मध्ये अजूनही टांगून ठेवलेले दिसले. ह्या पत्रापासूनच त्याला नेहमी स्फूर्ती मिळत असे ते असे तो आपल्या "Time for Reflection" ह्या आत्मचरित्रात म्हणतो.

**गोलंदाजाचा फलंदाज झाला**

एक उत्कृष्ट लेग–ब्रेक बोलर म्हणून कोलीनने आपल्या क्रिकेटची सुरुवात केली. त्यावेळी सुरुवातीच्या एका सामन्यात त्याने ३८ धावात नऊ गडी बाद केले होते. त्यात एका "हॅट–ट्रिक"चा सुद्धा समावेश होता, बोलर असल्याने तो नेहमी अकरावा खेळत असे. जसजसे तो फलंदाजीमध्ये प्रभुत्व मिळवू लागला तसतसे तो बॅटिंग ऑर्डरमध्ये वर वर चढू लागला.

१९४६ साली त्याला पहिल्या दर्जाच्या आंतरशालेय क्रिकेट स्पर्धेत गोलंदाज म्हणून खेळावयास मिळाले. त्या पहिल्याच वर्षी त्याने आपल्या चतुरस्त्र खेळाची सर्वांना चुणुक दाखविली. एका सामन्यात त्याने ७५ व ४४ धावा काढल्या आणि विरुद्ध संघाच्या पहिल्या डावात ५८ धावात तीन व दुसऱ्या डावात ५९ धावात पाच बळी घेतले आणि शाळेला सामना जिंकून दिला. त्याच्या ह्या चतुरस्त्र खेळाचे वर्णन करताना London Times ने म्हटले होते की "एका लेगब्रेक बोलरला बॅटिंग ऑर्डरमध्ये बढती मिळाली.

तिसऱ्या वर्षी, १९४९ मध्ये तो शाळेचा कॅप्टन झाला आणि दुसऱ्याच सामन्यात त्याला मोठे आव्हान स्वीकारावे लागले. कमीत कमी वेळात २५४ धावा करून सामना जिंकावयाचे आव्हान त्याने स्वीकारलेही. स्वतः आघाडीला आला आणि सामना संपण्यास ४० मिनिटे असताना दोन गडी बाद २६२ धावा करून सामना जिंकला. त्याने नाबाद १८१ धावा काढून शाळेच्या चाळीस वर्षांच्या फलंदाजीतील उच्चांक गाठला.

ह्या मोसमात त्याने बॅटिंग-बोलींगच्या सरासरीत १९४८ च्या हंगामाप्रमाणे पुन्हा एकदा अग्रक्रम मिळविला. त्याची त्यामुळे Public Schools संघात विनासायास निवड झाली. त्यावेळी त्याने ६२ धावात Comdined Services चे पाच गडी बाद केले त्यामध्ये पीटर मे हाही होता.

**'विस्डेन 'कडून गौरव**

१९५० साली त्याला अव्वल दर्जाच्या सामन्यात खेळावयास मिळाले. त्या वर्षीच्या खेळाचा आढावा घेताना Wisden ह्या सुविख्यात क्रिकेट वार्षिकाने कौड्रीच्या " Tonbridge चा कॅप्टन कौड्री ह्याने केंट परगण्याकडून खेळताना पहिल्याच वर्षी आपल्या क्रिकेट कारकीर्दीची सुरुवात यशस्वीरीत्या केली आहे. फक्त लेस्ली एम्स् आणि कोलीन कौड्री ह्यानीच वेगवान गोलंदाजीला आत्मविश्वासाने तोंड दिले." असा उल्लेख केला आहे.

बॅटिंगची जबाबदारी वाढत गेल्याने त्याच्या गोलंदाजीवर परिणाम होऊ लागला व बॅटने तो जितक्या उत्कृष्ट रीतीने खेळू लागला तितक्याच प्रमाणात त्याची गोलंदाजी निष्प्रभ ठरू लागली.

१९५२ पासून तो ऑक्सफर्ड विद्यापीठातर्फे खेळू लागला व पुढे तिसऱ्याच वर्षी त्याने विद्यापीठाचे कर्णधारपद भूषविले.

नामवंत खेळाडूंचा खेळ पाहून त्यापासून काही शिकता येईल याकडे त्याचे नेहमी लक्ष असते. त्यादृष्टीनेच तो सामने पाहत असतो.



### काय बिशाद आहे कॅच सुटण्याची

भारतीय क्रिकेट क्लबच्या कार्यालयात एकदा एक १०/१२ वर्षाचा मुलगा आला. सुदैवाने त्याच वेळी क्लबच्या संघाचे कर्णधारही तेथे आले होते. मुलाने 'बंडू बडोदेकर' असे आपले नाव सांगून क्रिकेटक्षेत्रात, विशेषतः भारतीय संघाच्या दृष्टीने आपण फार महत्वाचा शोध लावला असल्याचे सांगितले, तेव्हा कर्णधार त्याचे म्हणणे लक्षपूर्वक ऐकू लागले. तो म्हणाला, "मॅचमधला एकही कॅच सुटणार नाही असा माझा शोध आहे." अधिक स्पष्टीकरण करण्यास सांगितल्यावर तो म्हणाला, "कसोटी सामन्यासाठी वापरावयाच्या चेंडूमध्ये लोखंडाची गोळी बसवून ठेवायची आणि खेळाडूंच्या हाताच्या सर्व बोटातून लोहचुंबकाच्या आंगठ्या घालावयाच्या; मग काय बिशाद आहे की एकही कॅच सुटेल!"

### अनिलचे अजब अंदाजपत्रक

क्रिकेट मॅचला अनिल आरोळकर भारी तिकीट काढून आला होता. त्याच्या तुटपुंज्या पगारात त्याला हे कसं परवडतं म्हणून मी त्याला भीतभीतच त्याबद्दल विचारलं. त्यावर तो अगदी सहजपणे म्हणाला, "मी माझ्या उत्पन्नाचं अंदाजपत्रकच आखून टाकलं आहे. पगाराचे ४० टक्के घरभाड्यात, ४० टक्के अन्नधान्यादि पदार्थात, २० टक्के कपड्यात आणि २५ टक्के नाटक-सिनेमा-खेळ इत्यादींमध्ये मी खर्च करतो." मी म्हणालो, "अरे हे तर सव्वाशे टक्के झाले." अनिल म्हणाला, "मला ते माहीत नाही असं समजता की काय?"

— किशन








१९५२ मध्ये भारतीय संघाचे कर्णधार विजय हजारे ऑक्सफर्ड विद्यापीठाविरुद्ध खेळत असताना कौड्रीला त्यांचा खेळ फार आवडला. गुडघ्यावर बसून स्क्वेअरला फटका टोलविण्यासाठी हजारे घेत असलेला पवित्रा कौड्रीच्या मनात भरला. लेन.हटनला तो गुरुस्थानी मानतो. नंतर हजारे त्याला आपले दैवत वाटू लागले. हटन, हजारे व इन्सोल ह्यासारख्या अग्रगण्य फलंदाजांच्या खेळाचा अभ्यास करून त्याने आपले क्रिकेट घडविले. लहानपणी त्याच्या खेळातील एकाग्रता वाखाणण्यासारखी होती. त्यावद्दल अनेकानी त्याला शाबासकी दिली होती. मोठमोठे क्रिकेटपटू त्याच्या खेळाबद्दल प्रशंसोद्‌गार काढीत असत. त्यामुळे त्याचा आत्मविश्वास वळावला. सुप्रसिद्ध गोलंदाज मॉरिस टेट ह्याजकडूनही त्याला क्रिकेटचे पाठ मिळाले होते. अशा तऱ्हेने लहानपणीच त्याला थोरामोठ्यांचे मार्गदर्शन लाभल्याने तो क्रिकेटमध्ये चांगलाच वाकबगार झाला.

कौड्रीचा खेळ मुख्यत्वे forward Play प्रकारचा आहे. ऑफ व ऑनला शानदार ड्राईव्ह करण्यात तो पटाईत आहे. गुडघ्यात वाकून सफाईने कट्स् मारण्यात तो सराईत आहे. त्याच्या खेळात शैली व कला यांचा सुरेख संगम झालेला आहे. फलंदाजीच्या वेळचे पदलालित्य footwork प्रेक्षणीय असते. १९५५ मध्ये दक्षिण आफ्रिकेचे द्रुतगती गोलंदाज नील ॲडकॉक व पीटर हायने ह्यांची फास्ट पण आखूड गोलंदाजी (short deliveries) कौड्रीच्या forward play पद्धतीमुळे हातावरच आदळत असे. पण ह्याही आखूड गोलंदाजीवर त्याने आपल्या फॉरवर्ड खेळात थोडाफार बदल करून मात केली आहे. तो जेव्हा आक्रमक रीतीने फलंदाजी करतो तेव्हा त्याच्याकडून निरनिराळ्या प्रकारचे स्ट्रोक्स पहावयास मिळतात. ऑस्ट्रेलियामधील फास्ट विकेटस्‌वर त्याचा खेळ प्रेक्षणीय ठरतो.

सुविख्यात क्रिकेटपटू वॉल्टर हॅमंड आणि कोलीन कौड्री ह्या दोघांच्या खेळात बरेच साम्य असल्याने बऱ्याचदा क्रिकेट समीक्षक कौड्रीची तुलना हॅमंडशी करतात. हॅमंडप्रमाणे कौड्री आत्मविश्वासाने खेळतो. बॅटिंगची मनोवेधक शैली हॅमंडसारखीच आहे. दोघांची शरीरयष्टी धिप्पाड व खांदे रुंद असून सरळ स्ट्रोक्स व ऑफ ड्राईव्ह मारण्यात दोघेही सारखेच पटाईत आहेत, म्हणून कौड्रीचा खेळ पाहताना तो हॅमंडची आठवण करून देतो. हॅमंडसारखे कौड्रीचे स्लिपमधील क्षेत्ररक्षणही अतिशय कसबी व हुकमी आहे. शंभराहून अधिक झेलांवरून हे सिद्ध होतेच.

## टीकाकारांची 'विकेट' घेतली

१९५४ मध्ये पाकिस्तानविरुद्ध झालेल्या चौथ्या कसोटी सामन्यासाठी कौड्रीची बारावा गडी म्हणून निवड झाली होती. पण पुढे तीन-चार महिन्यातच ऑस्ट्रेलियाला जाणाऱ्या इंग्लंडच्या संघात त्याचा समावेश करण्यात आला. तो आपला पहिला कसोटी सामना परदेशात—ऑस्ट्रेलियामधील ब्रिस्बेन येथे खेळला. ह्या दौऱ्याचे वेळी तो ऑक्सफर्ड विद्यापीठाचा विद्यार्थी होता.

१९५३ च्या मोसमात केंट परगण्यातील क्रिकेटपटूंच्या बॅटिंग सरासरीमध्ये पहिला क्रमांक (३५.६४) मिळविला होता. पण १९५४ सालच्या मोसमात त्याने लक्षवेधी स्कोअर्स केले नसतानादेखील त्याची ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यासाठी निवड केली म्हणून त्याच्या निवडी विरुद्ध टीकाकारानी गदारोळ उठविला होता. पण कौड्रीने सिडनी येथे न्यू साऊथ वेल्स विरुद्ध खेळताना दोन्ही डावात शतके फडकावून आपली नियुक्ती किती सार्थ आहे हे दर्शविले व टीकाकाराना निवड समितीच्या वतीने परस्पर उत्तर दिले. दौऱ्यावरील पाच कसोटी सामन्यात खेळून कॉम्पटनच्या खालोखाल ३१९ धावा करून एकूण सर्व सामन्यात हटन व मे बरोबरीने हजार धावा पुऱ्या केल्या. दौरा संपल्यावर सर्व टीकाकारानी एकमताने पीटर मे सारखा अगदी भरवशाचा आणि आधारस्तंभ खेळाडू म्हणून त्याचा गौरव केला.

मेलबर्न येथील तिसऱ्या कसोटी सामन्यात त्याने लावलेले पहिलेच शतक हे अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत काढलेले असल्याने फार महत्त्वाचे आहे. इंग्लंडच्या संघाचा १९१ धावात खुर्दा उडविला होता. त्यामध्ये एकट्या कौड्रीच्या १०२ धावा होत्या. प्रख्यात क्रिकेटसमीक्षक नेव्हील कार्डसने तर कौड्रीचे "हे पहिलेच शतक म्हणजे क्रिकेटमधील असामान्य कर्तृत्वाचे उदाहरण" म्हणून प्रशंसिलेले आहे.

## आघाडीची फलंदाजीही गाजविली

१९५५ मध्ये हटनच्या निवृत्तीमुळे इंग्लंडच्या संघाला आघाडीच्या फलंदाजाची उणीव फार प्रकर्षाने जाणवू लागली. ट्रेव्हर बेलीबरोबर केनियन, ग्रेव्हनी, लोसन, आयकिन ह्यासारख्याना पाठविण्याचा प्रयोग करून पाहिला पण कोणीही ती कामगिरी अपेक्षेप्रमाणे पार पाडू शकले नाही. अखेरीस निवड समितीने कौड्रीला आघाडीच्या फलंदाजीची सवय करायला आज्ञा केली. कौड्रीने हा आदेश शिरसावंद्य मानून अव्वल दर्जाच्या सामन्यात भरपूर प्रॅक्टीस करून निवड समितीच्या विश्वासास तो पात्र ठरला. आघाडीचा फलंदाज म्हणून त्याने १९५६ मध्ये ऑस्ट्रेलियाविरुद्ध कसोटी सामन्यात थोडेफार यश संपादिले; पण त्याला घवघवीत यश कमविता न आल्याने दक्षिण आफ्रिकेच्या दौऱ्यावर शेवटी शेवटी परत चौथ्या—पाचव्या क्रमांकावर बॅटिंग करावी लागली. मात्र वेळ येईल त्याप्रमाणे तो अधूनमधून आघाडीला बॅटिंगसाठी खेळत असतोच.

दक्षिण आफ्रिकेच्या दौऱ्यावरून परतल्यावर १९५७ साली त्याने केंट परगण्याची धुरा वाहण्यास प्रारंभ केला तो आजपर्यंत. ह्याच वर्षी त्याने एका जागतिक विक्रमात भाग घेतला. बर्मिंगहॅम येथील पहिल्याच कसोटी सामन्यात वेस्ट इंडिजच्या रामाधीनने इंग्लंडच्या फलंदाजाना फक्त १८६ धावात लोळविले व नंतर वॉलकॉट, सोवर्स, स्मिथ, वॉरेल ह्यांनी ४७४ धावांचा डोंगर रचला. अशा परिस्थितीत दुसऱ्या डावात पीटर मे बरोबर कौड्रीने ४११ धावांची भागीदारी करून चौथ्या विकेटसाठी जास्तीत जास्त धावांच्या भागीदारीचा जागतिक विक्रम प्रस्थापित केला.



# यानंतर मला पुन्हा मूल केव्हा व्हावे

बालकाच्या विकासाच्या दृष्टीने त्याच्या जीवनातील पहिल्या चार पाच वर्षांचा काळ फार महत्त्वाचा असतो असं डॉक्टर्स सांगतात. मातेच्या आरोग्याच्या दृष्टीनेही, पहिल्या अपत्याचा पाठीवर तिला निदान तीन-चार वर्षांनंतरच पुन्हा मूल होणे इष्ट असते.

संतती नियमनाच्या अनेक साध्या व परिणामकारी पद्धती आजमितीस उपलब्ध आहेत. आता अपत्यजन्म ही योगायोगाची अथवा नशिबाची गोष्ट राहिलेली नाहीं. पाहिजे तेव्हाच आपणांस अपत्य होऊ देणे आता तुमच्या हातचे आहे.

मोफत सल्ला व सहाय यांच्यासाठी नजीकच्या कुटुंब नियोजन केंद्रात विचारणा करा.

**आणि लक्षात ठेवा :**





दोन वा तीन मुले पुरेत.



davp 68/280



# दाणादाण !

## त्याच्याकडे लक्ष देऊ नका !

कसोटी सामन्यानंतर बरेच झेल सोडलेल्या एका खेळाडूचा मित्र त्याला भेटला नि म्हणाला, "तुझ्यावर 'दाणादाण' पत्रात किती टीका आलीय ती पाहिलीस का ?" खेळाडू म्हणाला, "मला माहिती आहे तो 'दाणादाण'चा संपादक. त्याला स्वतःची मुळीच अक्कल नाही. लोक बोलतात त्याचीच तो केवळ पोपटपंची करीत असतो. त्याच्याकडे लक्ष देऊ नको !"

## तेवढी बॅट काढून घ्या की !

क्रिकेटच्या खेळाची माहिती नसलेला एक खेडवळ एकदा क्रिकेटचा सामना पाहात उभा होता. गोलंदाजाने चेंडू टाकला की फलंदाज तो फटकावीत असे. ते पाहून त्याने चौकशी केली की या चेंडू फेकणाऱ्याने काय करायचे असते. तिथे उभ्या असलेल्या एकाने खुलासा केला की त्याचा चेंडू फलंदाजानजिकच्या दांड्याना लागला म्हणजे तो 'बाद' होईल. तेव्हा तो खेडूत म्हणाला,"ते तर अगदी सोपं आहे. त्याच्या आजूबाजूला ५/६ जण दिसताहेत, त्यानी त्या फलंदाजाला धरून त्याच्या हाताची ती फळी काढून घ्यावी, म्हणजे पहा चेंडू त्या दांड्यावर आपटतो की नाही ते."

— किशन

आणखी एका जागतिक विक्रमात कौड्रीने भागीदारी केली आहे. ती भागीदारी बॅटिंगची वरची फळी सांभाळताना नव्हे तर अगदी शेवटी शेवटी खेळताना केली आहे. १९६३ साली वेलिंग्टन येथील दुसऱ्या कसोटी सामन्यात क्षेत्ररक्षण करीत असताना त्याच्या हाताची बोटे इतकी दुखावली होती की त्याला बॅटही नीट धरता येत नव्हती. म्हणून दुसऱ्या दिवशी बॅटिंगसाठी अगदी खालच्या क्रमांकावर म्हणजे सातवी विकेट पडल्यावर आला. बोटांना इजा झाली असल्याने बॅट धरण्याची पद्धत बदलून त्याने नाबाद शतक झळकाविले. आणि यष्टीरक्षक स्मिथबरोबर नवव्या विकेटसाठी १६३ धावांची भागीदारी करून एक नवा जागतिक उच्चांक प्रस्थापित केला.

## विक्रमांचीच मालिका

१९५८–५९ मध्ये ऑस्ट्रेलिया न्यूझीलंडला गेलेल्या इंग्लंडच्या संघाचा कौड्री उपनेता होता. कर्णधारपद भूषविण्याचा मान त्याला १९५९ मध्ये भारताविरुद्ध झालेल्या चौथ्या कसोटी सामन्यात मिळाला. कारण कर्णधार मे हा आजारी पडला होता. कर्णधारपदाची माला खऱ्या अर्थाने १९६० मध्ये दक्षिण आफ्रिकेविरुद्ध झालेल्या सामन्यात कौड्रीच्या गळ्यात पडली. त्याने आजपर्यंतच्या २४ कसोटी सामन्यांचे नेतृत्व स्वीकारलेल्या सामन्यांमध्ये तो ४ वेळा हरला तर आठ वेळा त्याने विजयश्री संपादिली. पाकिस्तानखेरीज सर्व देशात मिळून खेळलेल्या १०१ कसोटी सामन्यात त्याने एकूण ७,११७ धावा केल्या असून डॉन ब्रॅडमनच्या ६९९६ धावांचा उच्चांक मोडला व वॉल्टर हॅमंडच्या ७,२४९ धावांचा सर्वांक ओलांडावयास त्याला आता कितीसा अवधी लागणार ? पाकिस्तानखेरीज सर्व देशात व पाकिस्तानसहीत सर्व देशांच्या संघांविरुद्ध त्याने शतक झळकाविले असून १९६२ साली पाकिस्तानविरुद्ध ओव्हलवर काढलेल्या १८२ धावा हा त्याचा कसोटी सामन्यातील सर्वोच्च स्कोअर होय.

१९५० ते १९६८ ह्या १८ वर्षांच्या प्रथम दर्जाच्या क्रिकेट कारकीर्दीत त्याने एकूण ३३,३४६ धावा केल्या असून ८१ शतके फडकाविली आहेत. त्याच्या धावांची सरासरी प्रत्येक डावात ४३.७० पडते. ह्या काळात त्याने मोसमात हजार धावा काढण्याचा विक्रम २२ वेळा केला असून दोन मोसमात दोन हजार धावांची मजल मारली आहे. एका सामन्यातील दोन्ही डावात शतके लावण्याचा पराक्रम त्याने तीनदा केला आहे. १९६२–६३ मध्ये अॅडलेड येथे दक्षिण ऑस्ट्रेलियाविरुद्ध केलेल्या ३०७ धावा त्याच्या प्रथम श्रेणीच्या सामन्यातील सर्वात जास्त धावा होत.

## पितृछत्र हरपले

कौड्रीचे क्रीडानैपुण्य फक्त क्रिकेटपुरते मर्यादित नव्हते. शाळा-कॉलेजमध्ये असताना तो इतरही खेळ खेळत असे. रॅकेट, टेनिस,गोल्फ, रग् बी, फुटबॉल वगैरे खेळातही त्याने बक्षिसे मिळविली आहेत. एकदा फुटबॉल खेळताना त्याच्या दोन्ही पायांच्या आंगठ्याना जबर मार बसला होता. त्यामुळे त्याने फुटबॉलला कायमचा रामराम ठोकला. नंतर पुढे एका क्रिकेट सामन्यात एका वेगवान चेंडूने ह्याच अंगठ्यावर पुन्हा एकदा दुखापत झाली. दहा दिवस असह्य कळा सोसाव्या लागल्या. वडिलाना जेव्हा तो आपले दुःख सांगू लागला, तेव्हा ते म्हणाले, "हात वेड्या, एवढ्या मामुली दुखापतीने काय रडतोस. क्रिकेटपटूना याहीपेक्षा मोठ्या जखमा होतात. अशा तऱ्हेने तू जर लहानशा बाबतीत रडत बसलास तर तू पुढे क्रीडांगण कसे गाजविणार."

अशा तऱ्हेने अगदी लहानपणापासून कौड्रीला प्रोत्साहन देणारे त्याचे वडील आजचा कौड्रीचा लौकिक पहावयास ह्यात नाहीत, हा मोठा दैवदुर्विलास होय! वडिलाना आपल्या चिरंजीवाने खेळलेला निदान पहिला कसोटी सामना तरी पहावयास मिळावा, पण छे! ते तसेही शक्य नव्हते. १९५४–५५ साली ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यावर जाणाऱ्या संघात कोलीनची प्रथमच निवड झाल्याची सुवार्ता त्याना ऐकावयास मिळाली, एवढेच ! सत्कारार्थ त्यानी मेजवानी दिली व दौऱ्यावर निघताना कौड्रीला 'शुभास्ते पंथानः' केले आणि कौड्रीचा बोटीचा प्रवास संपतो न संपतो तोच इकडे मायदेशी वडिलांचे आकस्मिक निधन झाले. ज्यानी कौड्रीचे क्रिकेट ठरविले-घडविले त्याना ते बहरलेले व फलद्रूप झालेले पहावयास न मिळणे ही निसर्गाची क्रूर चेष्टाच नव्हे तर काय?







वडिलांच्या आकस्मिक निधनामुळे त्याचा आर्थिक पाठिंबा खुंटला. त्याला ऑक्सफर्ड विद्यापीठातील शिक्षण अपुरेच सोडावे लागून नोकरीच्या शोधार्थ अन्यत्र जावे लागले. एका क्रिकेटप्रेमी कापड व्यापाऱ्याच्या Department Stores मध्ये त्याला नोकरी लागलीच मिळाली. अजूनपर्यंत तो तेथेच नोकरी करीत आहे. आरामशीर नोकरी असल्याकारणाने त्याचे शरीर स्थूल बनत चालले होते व त्याचा परिणाम त्याच्या क्रिकेटवर होऊ लागला. तेव्हा त्याला नित्यनियमाने व्यायाम करावा लागे व आपले वजन काबूत ठेवावे लागे. क्रिकेटसाठी प्रमाणबद्ध शरीरयष्टी ठेवण्याकडे त्याचा कटाक्ष असतो. शाळेत असताना देखील त्याला नियमितपणे व्यायाम करण्याची सवय होती. कारण तसे न केल्यास झोपण्याच्या वेळी त्याला फटक्यांची शिक्षा मिळे.

त्याने वेळोवेळी केलेल्या पराक्रमाबद्दल त्याचा अनेकजणांनी गौरव केला आहे. १९५३ साली "उत्कृष्ट तरुण क्रिकेटपटू" म्हणून इंग्लंडमधील Cricket Writers Club ने त्याची वाहवा केली. १९५५ च्या विस्डेन वार्षिकाच्या क्रिकेटपटूंच्या पंचायतनात बसण्याचा मान त्याला मिळाला.

कौड्री आज पस्तीस वर्षांचा आहे. पण तो एखाद्या विशीतल्या खेळाडूसारखा बॅटिंग करीत आहे. त्याचा चालू फॉर्म आणखी पाचसहा वर्षे टिकला तर तो कोणालाही पादाक्रांत न करता येण्यासारखी शिखरे गाठील व आजवर गाठलेल्या उत्तुंग शिखरावर सोन्याचा कळस चढवील असे बिनधोकपणे म्हणता येईल.आजवर त्याने शतकांची परिभाषा प्रमाण मानली आहे. त्याबरहुकूम त्याने धावांची शतके गाठली, झेलांचे शतक पुरे केले, कोणी कधीही करू शकले नाही त्या कसोटी सामन्यांची शंभरी पुरी केली. म्हणून त्याची बॅट आगामी काळात आणखी काय काय पराक्रम करणार हे पाहण्या-वाचण्या-साठी क्रीडारसिक उत्सुक आहेत.

**दृष्टिक्षेपात कोलीन कौड्रीची क्रिकेट कारकीर्द**

| विरुद्ध संघ | कसोटी सामने | डाव | नाबाद | एकूण धावा | सर्वांक | सरासरी | शतके |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ऑस्ट्रेलिया | ३५ | ६२ | ४ | २,२०८ | ११३ | ३८.०६ | ५ |
| | १७ | २२ | ५ | १,०३४ | नाबाद १२८ | ६०.८२ | २ |
| न्यूझीलंड | १४ | २७ | १ | १,०२१ | नाबाद १२८ | ३९.२६ | ३ |
| दक्षिण आफ्रिका | २१ | ३७ | २ | १,७५१ | १५५ | ५०.२८ | ६ |
| वेस्ट इंडिज | ८ | ११ | २ | ६५३ | १५४ | ७२.५५ | ३ |
| भारत | | | | | | | |
| पाकिस्तान | ६ | ९ | १ | ४५० | १८२ | ५६.२५ | २ |
| एकूण | १०१ | १६८ | १५ | ७,११७ | १८२ | ४६.५१ | २१ |

## इथे ओशाळला मृत्यु



काही क्रिकेटियर्स मुंबईच्या स्टेडियमवर सरावासाठी आले होते. पुरेशी प्रॅक्टीस झाल्यानंतर परत जाताना आपापसात गप्पा रंगत आल्या होत्या. चंदू बोर्डे एकदम गंभीर झाला. त्याला खडकीनजीक झालेल्या अपघाताची आठवण झाली. जीवावर बेतलेला तो प्रसंग सांगून तो आपले सामान आवरू लागला आणि त्याच्या जवळ उभा असलेल्या रमाकांत देसाईने मिस्किलपणे पुढील चौकार हाणला, "इथे ओशाळला मृत्यु!"

## मी जिंकलो : मी हरलो

बरेचसे नावाजलेले खेळाडू, ऑस्ट्रेलिया-न्यूझीलंडच्या दौऱ्यावर गेल्यामुळे अननुभवी तरुण खेळाडूंना हाताशी घेऊन मनोहर हर्डीकर मोठ्या जिद्दीने झुंजला. क्रिकेट इतिहासात नव्याने नोंद केली गेली, "मुंबईने सतत दहा वर्षे रणजी करंडक जिंकून जागतिक विक्रम निर्माण केला.

सतत ९ वेळा जिंकून जागतिक विक्रमाची बरोबरी केल्या-नंतर १० व्यांदा तो जिंकून नवा विक्रम करणाऱ्या हर्डीकरला वेस्ट इंडीज संघाविरुद्ध फक्त एकदाच कसोटी सामना खेळायला मिळाला आहे. त्याची आठवण ठेवून तो निवृत्त झाल्यावर म्हणतो आहे,

"मी जिंकलो, मी हरलो!"







अनुक्रमणिका

# भारतात



रंगा सोहोनी



सदा मोहोळ



उमेश कुळकर्णी

**द्रुतगती गोलंदाजांचा अभाव ही भारताची अलिकडे डोकेदुखी होऊन राहिली आहे. त्याबाबत सुप्रसिद्ध गोलंदाज श्री. रंगा सोहोनी, श्री. सदा मोहोळ आणि श्री. उमेश कुळकर्णी यानी खास दीपावलीसाठी प्रा. अविनाश केळकर यांच्यापाशी व्यक्त केलेले हे विचार....**

भारतीय क्रिकेट संघाने गेल्या दोन वर्षात इंग्लंड, ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड या देशांचे दौरे काढले. न्यूझीलंडसारख्या दुबळ्या संघाविरुद्ध परदेशात कसोटी मालिका जिंकण्याचाही प्रथमच मान मिळविला; परंतु याच न्यूझीलंडने एका कसोटी सामन्यात आपल्या संघाला पराभूत केले. ऑस्ट्रेलिया आणि इंग्लंड या दोन्ही संघानी आपल्या संघाचा सर्वच्या सर्व कसोटी सामन्यात पराभव केला. इंग्लंडचा दौरा पुरा झाल्यावर आपल्या संघाचा कर्णधार पतौडी याने पराभवाची मीमांसा करताना असे एक विधान केले की भारताने किमान दोन द्रुतगती गोलंदाज तयार केल्याशिवाय परदेशाचा दौरा काढण्याची घिसाडघाई करू नये; परंतु या घोषणेनंतर आपण काय केले? काय करणार आहोत? त्यासंबंधी काही निश्चित योजना आपल्यापाशी आहेत का? की घोषणा या उच्चारल्यानंतर आपण त्या नेहमीप्रमाणे विसरून जावयाच्या असतात.





अनुक्रमणिका

# द्रुतगती गोलंदाज कां नाहीत?

भारतात आज जलदगती गोलंदाजांचे दुर्भिक्ष कां? स्थूलमानाने तीस वर्षापूर्वी आपल्याकडे महंमद निसार आणि रामजी हे जागतिक कीर्तीचे द्रुतगती गोलंदाज होते. अमरसिंग, शूते बॅनर्जी ह्यांचा वेग निसार–रामजी यांच्याइतका नसला तरीही त्यांना आजच्या मानाने जलदगती गोलंदाजच म्हणावे लागेल. १९४० च्या सुमारास पंचरंगी सामन्यात मुसलमान संघातून एका सामन्यात खेळलेला व मागाहून डावलला गेलेला मीर मजुल महंमद किंवा त्याच सुमारास हिंदू संघातून एक दोन सामन्यात खेळून चमकून गेलेला देवराज पुरी ह्यांची गणना द्रुतगती गोलंदाजात करावी लागेल. यापुढील कालखंडात तयार झालेले रंगा सोहोनी, दत्ता फडकर, रंगाचारी हे खरेखुरे द्रुतगती गोलंदाज नसले तरी उत्कृष्ट मध्यम द्रुतगती गोलंदाज होते. स्थूलमानाने असे म्हणता येईल की १९५० नंतर आपल्याकडे द्रुतगती सोडाच पण फडकर यांच्या निवृत्तीनंतर आघाडीचा उत्कृष्ट असा मध्यमगती गोलंदाजही तयार झालेला नाही. ज्याना आपण आज आघाडीचे मध्यमगती गोलंदाज म्हणतो त्या रमाकांत देसाई,उमेश कुळकर्णी यांचा प्रभाव ऑस्ट्रेलिया-न्यूझीलंडच्या दौऱ्यात कितीसा पडला? त्यातही गेल्या पाच वर्षात पतौडीच्या अमदानीत आघाडीची गोलंदाजी कुणी करावी याला काही धरबंधच राहिला नाही. पतौडी, सलीम दुराणी, वाडेकर, चंद्रशेखर हे काय आघाडीचे गोलंदाज आहेत? फार काय इंग्लंडमधील दौऱ्यात एका कसोटी सामन्यात यष्टीरक्षक म्हणून अंतर्भाव झालेल्या बुधी कुंदरन् यालाच ही कामगिरी कर्णधाराने दिली होती हे आठवते ना? वेस्ट इंडीजबरोबर झालेल्या मुंबईतील कसोटी सामन्यात नवा चेंडू हिरवळीवर घासून मग तो दुराणीकडे देण्याचा मूर्खपणा आपणच केला ना? भारतासारख्या पन्नास कोटी लोकसंख्या असणाऱ्या राष्ट्राची यात काहीच मानहानी होत नाही का? पण आपण पन्नास हजार प्रेक्षकानी हे दृश्य डोळ्यावर कातडे ओढून लाचारीने पाहिले. त्याचे पडसाद मागाहून वृत्तपत्रातून तरी उमटले का? ही सर्वच परिस्थिती चिंतनीय आहे. रामजी, निसार, अमरसिंग,बॅनर्जी,फडकर, रंगाचारी– ज्या मातीतून निर्माण झाले त्याच मातीतून आता नवे गोलंदाज तयार होणार नाहीत का? या सर्व परिस्थितीला जबाबदार कोण? यातून काही नवी दिशा दिसेल का? हे समजून घेण्यासाठी मागील पिढीतील भारताचे एक आघाडीचे गोलंदाज श्री. रंगा सोहोनी, इंग्लंडच्या दौऱ्यावर गेलेले महाराष्ट्राचे एक प्रसिद्ध गोलंदाज श्री. सदा मोहोळ आणि ऑस्ट्रेलिया–न्यझीलंडच्या दौऱ्यावरून नुकतेच आलेले श्री. उमेश कुळकर्णी यांच्याशी मी चर्चा केली. श्री. सोहोनी हे इंग्लंड (१९४६) व ऑस्ट्रेलिया (१९४७–४८) या दोन्ही देशांच्या दौऱ्यावर गेलेले होते. आघाडीचा गोलंदाज म्हणूनच त्यांची निवड झालेली होती. शिवाय महाराष्ट्र आणि मुंबई या दोन्ही संघाचे कर्णधारपदही त्यानी (रणजी करंडक सामन्यासाठी) भूषविले होते. त्यांच्या सारख्या अनुभवी आणि मुरब्बी खेळाडूच्या सूचना मोलाच्या ठराव्यात. श्री. सदा मोहोळ याना कसोटी सामन्यात खेळण्याची संधी मिळाली नाही. गेली ८/९ वर्षे महाराष्ट्र संघाच्या गोलंदाजीचे ते एक आधारस्तंभ होते. नव्या आणि जुन्या अशा दोन्ही प्रकारच्या चेंडूने गोलंदाजी करण्यात ते कुशल आहेत.

**आज निसार–रामजी–अमरसिंग कां तयार होणार नाहीत?**

माझ्या प्रश्नाना उत्तरे देताना श्री. रंगा सोहोनी म्हणाले, "आपल्याकडे पूर्वी निसार, रामजी किंवा शूते बॅनर्जी हे जागतिक दर्जाचे द्रुतगती गोलंदाज होऊन गेले. अमरसिंग, दत्ता फडकर किंवा रंगाचारी यांच्यासारखे सामने जिंकून देणारे दर्जेदार मध्यमगती गोलंदाज झाले. ज्याना महत्त्वाच्या सामन्यात फारशी संधीच मिळाली नाही असे महाराष्ट्राचे कै. के. एम्. जाधव, देवराज पुरी, मीर मजुल महंमद यांच्यासारखे बरेच द्रुतगती गोलंदाज आपल्या देशात पूर्वी निर्माण झाले. मग आता कां होणार नाहीत? मी याबाबत आशावादी आहे. परंतु आपल्याजवळ याबाबत कोणतीही योजना नाही. आपण फक्त घोषणा करतो. त्याप्रमाणे कृती कुणी करायची?"

"याबाबत आपण काही योजना सुचवाल का?" मी विचारले.

"भारतात सामान्यतः पंधरा सोळा क्रिकेट असोसिएशन्स आहेत. त्यांनी पाच चांगली ऊंच, तगडी, धडधाकट क्रिकेटप्रेमी मुले निवडावी. अशी सुमारे ऐंशी मुले निवडून त्यातील निवडक दहा मुलाना क्रिकेट शिक्षण द्यावे. त्यासाठी योजनाबद्ध आखणी करावी आणि तज्ज्ञ शिक्षकासाठी आपल्याच देशातील जुने, अनुभवी गोलंदाज निवडावे. आपल्या देशात शूते बॅनर्जी, फडकर, रंगाचारी, गुलाम गार्ड असे कितीतरी अनुभवी गोलंदाज आहेत. त्यांचा उपयोग कां करू नये? त्यासाठी परदेशातून खेळाडू मागविण्याची आणि त्यासाठी हजारो रुपये खर्च करण्याची काय आवश्यकता आहे? आणि हे हजारो रुपये वाचवून त्याचा उपयोग होतकरू गोलंदाजाना सकस अन्न किंवा पौष्टिक आहार देण्याकडे करावा."

"पण हा सर्व खर्च कुणी करावा?"

"क्रिकेट बोर्डाने. अर्थात या योजनेमुळे एकदोन वर्षात ताबडतोब आघाडीचे गोलंदाज तयार होणार नाहीत. त्यासाठी किमान पाच वर्षांची तपश्चर्या हवी. होतकरू खेळाडूनी कोणतेही व्यसन लावून न घेता खूप तपस्या करायला हवी. धावणे, आसने करणे, गोलंदाजीचा सतत सराव करणे, फार काय लाकडे फोडणे असले व्यायामाचे प्रकार करून शरीर लवचिक ठेवायला हवे."

"पण आपल्या या निर्जीव खेळपट्ट्यांबद्दल काय करावे?"








"खेळपट्टया बदलता येणार नाहीत. परंतु त्यात थोडेफार बदल करता येतील. पाणी मारून, रोलिंग कमी करून त्याना सजीव करता येतील. कलकत्ता येथील इडन गार्डन्स आणि मद्रासमधील चीपक या खेळपट्टया गोलंदाजाना अनुकूल आहेत. येथे सामन्यांचे निकाल पूर्वी लागत. परंतु हल्ली मद्रासचा कसोटी सामना चीपक येथे होत नाही. स्टेडियमच्या निर्जीव खेळपट्टीवर होतो. दुसरे असे की प्रत्येक सामन्यात किमान दोन आघाडीच्या गोलंदाजांची निवड झाली पाहिजे. होते काय, आपण गोलंदाजांकडून फलंदाजीचीही अपेक्षा करतो हे चूक आहे. विशेषतः आघाडीची गोलंदाजी करून तो खेळाडू अक्षरशः दमतो. त्याच्याजवळ स्टॅमिनाच उरत नाही. कारण गोलंदाजीचा ताण फार पडतो. दत्ता फडकर यांचे याबाबत मी उदाहरण देईन. त्याना दोन्ही करावी लागत. त्यामुळे त्यांचे क्रिकेट फार लवकर म्हणजे त्यांच्या वयाच्या तिशीतच संपले. समजा त्यानी मागाहून गोलंदाजी टाकली असती आणि केवळ फलंदाजीच केली असती तर त्याचा फायदा आपल्याला आणखी दहा वर्षे तरी मिळाला असता. कसोटी सामना पाचही दिवस चालला पाहिजे. तो एक दिवस आधी संपला तर आर्थिक तोटा होतो हे आपले धोरण असते. आणखी एक मुद्दा सुचतो तो असा की आपण प्रत्येक वेळी किमान दोन तथाकथित मध्यमगती गोलंदाजाना सातत्याने स्थान दिले पाहिजे. या गोलंदाजाना केव्हाना केव्हा आपल्याला कसोटी सामन्यात संधी मिळणारच असे प्रलोभन निर्माण झाल्याशिवाय हे तरुण केवळ गोलंदाजीलाच चिकटून राहाणार नाहीत. आणखी माझी एक तक्रार आहे ती निवड समितीबद्दल. आपण काही विवक्षित खेळाडूना वर्षानुवर्षे कसोटी सामन्यातून खेळण्याची संधी देतो. त्या वेळी त्याच दर्जाचे, त्याला प्रतिस्पर्धी असणारे इतर खेळाडू असतात हे आपण विसरतो."

"हा तुमचा मुद्दा अधिक स्पष्ट करा ना."

"असं पाहा, आपल्याकडे तीन किंवा चार चांगले दर्जेदार यष्टीरक्षक आहेत असं समजा. आपण काय करतो, एकाला वर्षानुवर्षे संधी देतो. तो जखमी झाला किंवा आजारी पडला तर त्याच्या जागी दुसरा घेतो. उरलेले दोन यष्टीरक्षक असतात. त्यांचे काय? केवळ त्याना संधी मिळत नाही म्हणून त्याना दर्जा नाही असा अपसमज निर्माण होतो. म्हणून मी असं सुचवीन की आलटून पालटून त्या सर्वाना संधी द्यावी. त्यामुळे सर्वाना उत्तेजन मिळते व स्पर्धाही वाढते. त्यामुळे प्रत्येकजण जबाबदारीने खेळेल."

"याबाबत काही उदाहरणे द्याल काय?"

"मी आमच्या वेळची दोन तीन उदाहरणे देतो. महाराष्ट्रात पूर्वी के. एम्. जाधव नांवाचा दर्जेदार आघाडीचा गोलंदाज होता. त्याला कसोटी सामना किंवा एक तरी दौरा मिळाला का? दुसरे यापेक्षाही चांगले उदाहरण मद्रासचा अष्टपैलू खेळाडू रामसिंग याचे. तो उत्कृष्ट फिरकी गोलंदाज होता. त्याला कुणी संधी दिली? तिसरे उदाहरण कै. सदू शिंदे. हा लेगब्रेक गुगली गोलंदाज होता. श्रेष्ठ प्रतीचा होता. तो जेव्हा फार्मात होता त्यावेळी ऑस्ट्रेलियाचा दौरा झाला. (१९४७) झाली का निवड त्याची? यासाठी ज्या खेळाडूंचा दर्जा समान आहे, त्या सर्व दर्जेदार खेळाडूना समान संधी मिळायला हवी. नेहमी आपण किमान दोन किंवा तीनही कसोटी संघ तयार ठेवायला हवेत आणि खेळाडूंची निवड केवळ गुणवत्तेवर व्हायला हवी.

## भारतातील निर्जीव खेळपट्टया

"आपल्या देशातल्या खेळपट्टया निर्जीव आहेत. त्याला अपवाद फक्त कलकत्त्याचा. दिवसभर जीव तोडून गोलंदाजी करावी पण त्याचा काहीही उपयोग होत नाही" असे सांगून श्री. **सदा मोहोळ** माझ्या प्रश्नाना उत्तरे देताना म्हणाले, "बळी मिळाले नाहीत की तुम्ही प्रेक्षक आमच्या गोलंदाजीला दर्जाच नाही असे हिणवायला तयारच! अशा परिस्थितीत या निर्जीव (Dead) खेळपट्टयांवर गोलंदाजानी जीवापाड परिश्रम कां करावेत? तो आपला स्टार्ट कमी करतो आणि मध्यमगती किंवा फिरकी गोलंदाजीकडे वळतो. कारण बळी मिळाले नाहीत तर पुढील सामन्यात आपल्याला संधीच मिळणार नाही याची चिंता त्याला असते – आणि फिरक्या गोलंदाजीमुळे त्याचे परिश्रमही कमी होतात. यामुळे कोणताही आजचा तरुण सहसा जलदगती गोलंदाजीकडे वळत नाही. यासाठी प्रथम खेळपट्टया सजीव करा – गोलंदाजाना आणि फलंदाजाना समान संधी मिळेल अशा प्रकारचे त्यात फेरफार करा असेच मी सुचवीन. शिवाय आजच्या तरुणापुढे इतर देशांप्रमाणे गोलंदाजीचे आदर्श आहेतच कुठे?"

"आपला आदर्श असण्याबद्दलचा मुद्दा अधिक सविस्तर सांगा ना?"

"सांगतो. इंग्लंडमधील होतकरू द्रुतगती गोलंदाजांसमोर ट्रुमन किंवा स्टॅथम यांचे आदर्श असतात. ऑस्ट्रेलियन लिंडवॉल-मिलर किंवा डेव्हिडसन यांचे आदर्श असतात. तर वेस्टइंडीजमधील तरुण हॉल–ग्रिफिथ–सोबर्स याना आदर्श मानतात व त्याप्रमाणे अनुकरण करतात. तसेच त्यांच्या आवतीभोवती इतरही जलदगती गोलंदाज असतात. या अनुकरणातून नवे होतकरू गोलंदाज तयार होतात. आपल्या देशात चांगले द्रुतगती सोडाच पण दर्जेदार मध्यमगती गोलंदाजही आज नाहीत. जे आहेत त्यांचा आपण पुरेसा उपयोग करीत नाही. त्यामुळे आजच्या तरुणांसमोर आदर्श असतात ते चंद्रशेखर, प्रसन्ना, बेदी किंवा नाडकर्णी–दुराणी या फिरकी गोलंदाजांचे. यामुळे चांगले द्रुतगती किंवा मध्यमगती गोलंदाज तयार होणार कसे?

"आपण इंग्लंडचा दौरा करून आला आहात. लँकेशायर लीगमध्येही एक वर्ष खेळला आहात. तेथील खेळपट्टया गोलंदाजाना अनुकूल असतात म्हणजे कशा स्वरूपाच्या असतात?"

"लँकेशायर लीगमधील क्रिकेटचा दर्जा नेहमीच कमी प्रतीचा असतो. तेव्हा आपण इंग्लंडमधील काउंटी सामन्यांच्या खेळपट्टयांबद्दलच बोलू या! त्या खेळपट्टया फलंदाजांइतक्यात गोलंदाजानाही

अनुकूल असतात. समसमान संधी देणाऱ्या असतात. चेंडू बराच वेळ स्विंग होऊ शकतो. जवळजवळ दिवसभर त्यामुळे गोलंदाजाना पुरेसा वाव मिळतो. हवामान थंड उत्साहवर्धक. त्यामुळे दिवसभर गोलंदाजी करूनही खेळाडू दमत नाही. शिवाय तेथील क्रीडांगणावरील हिरवळ ( Out field ) नेहमीच हिरवीगार असते."

"पण याचा उपयोग कसा काय होतो ? "

"त्याचं असं आहे आपल्याकडे टोला मारला की चेंडू जाऊन हिरवळीवर आपटतो. त्यातून त्याच्यावरील लकाकी जाते. इंग्लंड-मध्ये चेंडू हिरवळीवर टोलवला गेला की तेथे गवत जास्त असल्यामुळे लकाकी लवकर जात नाही. त्याचा फायदा गोलंदाजास मिळतो. शिवाय चांगल्या हवामानामुळे पहिले षटक ज्या उत्साहाने आणि वेगाने टाकतो त्याच वेगाने गोलंदाज दिवसाच्या अखेरचेही षटक टाकतो. मी स्वत: इंग्लंडच्या दौऱ्यावर गेल्यावर माझा गोलंदाजीचा स्टार्ट वाढविला." सदा मोहोळ विचार करीत पुढे म्हणाले, "आपण आपल्याजवळ जे काही मध्यमगती गोलंदाज आहेत त्यांच्यावर विश्वास (Confidence) टाकीत नाही. महाराष्ट्रातून मी स्वत:, अन्वर शेख, अकलखखान आणि अवि जोशी असे एका वेळी चार चार मध्यमगती गोलंदाज घेऊन त्यांच्या जोरावर कर्णधार चंदू बोर्डे यानी रणजी सामने जिंकून दाखविले आहेत. पण आपण कसोटी सामन्यात मात्र मध्यमगती गोलंदाजाना अवघी सात आठ षटके देतो. त्यातून त्याना प्रोत्साहन कसं काय मिळणार? ते आपला प्रभाव काय पाडणार?"

मी रंगा सोहोनी यांनी होतकरू गोलंदाजासाठी सुचविलेली योजना त्यांच्यापुढे मांडली. श्री. सदा मोहोळ यानी ही योजना स्वागतार्ह असल्याचे सांगितले. ते पुढे म्हणाले, "गोलंदाज एकदा तयार झाला (मॅच्युअर झाला ) की त्याने सातत्याने थोडा वेळ गोलंदाजीची सवय ठेवावी. आसने, व्यायाम, धावणे यानी आपला स्टॅमिना कायम राहील याची दक्षता घ्यावी. परंतु उगाच चार पाच तास दररोज गोलंदाजी करून फाजील परिश्रम करू नयेत. कारण त्यामुळे त्याची शक्ती फुकट जाते. शिवाय त्यामुळे गोलंदाज अकाली निकामी होतो. ही शक्ती राखून ठेवून त्याचा उपयोग सामन्यासाठी करावा. दुसरे असे की गोलंदाजी अगदी लहान वयातच सुरू करावी हे रंगा सोहोनीप्रमाणे मलाही मान्य नाही. मीही त्यांच्याप्रमाणेच वयाच्या वीस वर्षाच्या सुमारास गोलंदाजी करू लागलो. माझे वडील श्री. मामा मोहोळ हे स्वत: तरुणपणी कुस्तीगीर असल्यामुळे व्यायामाची गोडी लागली. पण मी गोलंदाजी करायला शिकलो तो उशीरा. त्यामुळे होतकरू गोलंदाजानी अगदी लहान वयातच (म्हणजे शाळेतच) गोलंदाजी सुरू करावी याला फारसा अर्थ नाही असं मला वाटते."

## गोलंदाजांच्या योगक्षेमाचा प्रश्न

"आपल्या देशातील तरुण पिढीमध्ये अखंड तपश्चर्या आणि परिश्रम करण्याची आवड कमी झाली आहे." असे विधान करून श्री. उमेश कुळकर्णी पुढे म्हणाले, "द्रुतगती असो की मध्यमगती गोलंदाज असो, त्याच्यामागे अनेक वर्षांची, चिकाटीची, परिश्रमांची तपस्या आवश्यक असते. हे परिश्रम एकलव्याच्या निष्ठने व्हायला हवेत. अर्थात आपल्या खेळपट्ट्या ह्या निर्जीव आहेत, हवामान अशा प्रकारच्या गोलंदाजीस अनुकूल नाही. ह्या श्री. सदा मोहोळ यानी केलेल्या विधानाशी मी सहमत आहे. होतकरू गोलंदाजाना तयार करण्यासाठी पूर्वनियोजित योजना असावी ही सूचनाही मोलाची आहे. पण ज्या होतकरू गोलंदाजाना निवडून शिक्षण द्यायचे त्यांच्या योगक्षेमाची काय व्यवस्था होणार आहे ? त्याना आर्थिक मदत किती आणि कोणत्या स्वरूपाची मिळणार आहे हा मुद्दा माझ्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा आहे."

"आपला हा मुद्दा महत्त्वाचा आहे. त्याबाबत अधिक स्पष्टीकरण कराल काय ?"

"मला म्हणायचं आहे ते असं. आजचा क्रिकेटपटू हा पूर्वीच्या अनेक क्रिकेपटूंप्रमाणे केवळ श्रीमंत किंवा सुखवस्तू घराण्यातून निर्माण होत नाही. तर तो कनिष्ठ मध्यम वर्गातून, फार काय झोपडपट्टीतूनही तयार होत आहे. मी कुणाचाही नामनिर्देश न करता असं म्हणेन की आजचे अनेक क्रिकेटपटू ह्या गरीब स्थितीतूनच पुढे येत आहेत. चांगले खेळत आहेत. त्यांच्याबद्दल अपेक्षा निर्माण होत आहेत. भावी काळात त्यांचा राष्ट्राला फायदा होईल. तीच गोष्ट योजना आखून तयार करण्याच्या द्रुतगती गोलंदाजाबद्दल. आपण त्याना आर्थिक पाठबळ मिळेल अशी काहीतरी व्यवस्था करायला हवी. त्याना सवलती मिळायला हव्यात. म्हणजेच त्यांच्या योगक्षेमाची पूर्णपणे काळजी घ्यायला हवी. नाहीतर कर्तृत्व असणारे होतकरू तरुण मिळतील परंतु त्यांची कारकीर्द अकाली खलास होईल. कारण गोलंदाज तयार झाला किंवा होत असला तर त्याला सकस आणि पौष्टिक आहार मिळाला पाहिजे. नाहीतर त्याचा स्टॅमिना राहणारच कसा ? "

पूर्वी आपले संस्थानिक अशा क्रिकेटपटूंना आश्रय देत. आजही काही कंपन्या, फर्मस् क्रिकेटपटूना आश्रय देतात ना?" मी विचारले.

"होय. देतात! म्हणूनच भारतात क्रिकेट जिवंत आहे. पण ते प्रयत्न अपुरे आहेत. राष्ट्राच्या इभ्रतीच्या दृष्टीने केवळ क्रिकेटपटूच नव्हेत तर हॉकी किंवा इतर खेळाडू यानाही त्याच सोयी व सवलती मिळायला हव्यात."

## ऑस्ट्रेलियातील खेळपट्ट्या कशा असतात ?

"ऑस्ट्रेलिया आणि भारत यांच्या खेळपट्ट्यांबद्दल आपल्या दृष्टीने फरक कोणता ? "

"ऑस्ट्रेलियातील हवामान असं आहे की तेथे गोलंदाजी करून दमायला होत नाही. त्याच्या उलट स्थिती इथली आहे. येथे चेंडूला उशी म्हणजे बाऊन्स मिळतो. अशी उशी मिळाल्याशिवाय झेल उडत नाहीत. तर आपल्याकडे ही उशी मिळत नसल्यामुळे

[ पान ५८ वर पहा ]











**स्वगत • कठपुतळीचा खेळ • प्रक्षोभ**

## जीवनाचे वास्तव रूप दर्शविणारी कादंबरी

जन्म आणि मरण या दोन टोकांमधल्या आयुष्याला आपण जीवन असं म्हणतो. ही दोन्हीही टोकं आपल्या हातातली नाहीत असं मानतो. पण मग जीवन तरी खरोखरी आपल्या हातात असतं का? जीवन सुखी व्हावं म्हणून प्रत्येक मनुष्य धडपड करतो. सुख मिळणं म्हणजे तरी काय? जे मिळालं नाही तर दुःख होतं म्हणजे तरी काय? जीवनातलं सुख-दुःख या कल्पना शेवटी केवळ कल्पनाच आहेत काय? मनात येतात ते विचार आणि शरीराकडून घडतो तो आचार–त्या परस्परांचा मेळ काय, कसा आणि कोणी लावायचा? सामान्य माणसाच्या आटोक्यात न येणारे आणि ज्याचं उत्तर कधीच न मिळणारे हे प्रश्न जेव्हा कलाकृतीत सहजपणे येतात तेव्हा तो विषय अध्यात्माचा न राहता केवळ मानवी जीवनाचा होऊन बसतो.

'चक्र' ह्या कलाकृतीतून वेगळेच जीवनदर्शन घडविणारे जयवंत दळवी 'स्व–गत' मधून अशाच एका सामान्य माणसाच्या जीवनकथेच्या निमित्ताने जीवनाचा मागोवा घेतात. त्यातून घडणारे जीवनदर्शन मनाला स्तिमित करीत असतानाच अन्तर्मुखही बनवते.

'शिवनाथ हरबा ओढवणे' या अति-सामान्य माणसाची ही कथा आहे. रूपामुळे एक चेष्टेचा विषय बनलेला हा माणूस कुणालाच नको आहे. जाड ओठ, राठ पण कुरळे केस, काळा रंग आणि चारचौघा-सारखीसुद्धा उंची नसलेला हा शिवनाथ जीवनाशी टक्कर देत आहे–आणि प्रत्येक ठिकाणी त्याला अपयश येत आहे. लहान-पणापासून हिडिसफिडिस केला गेलेला हा मुलगा एक प्रकारच्या कोंडीमध्ये अडकून पडतो. एकलकोंडेपणा हा त्याचा स्वभावच बनून जातो. एरवी चार-चौघा-सारख्याच त्याच्या सामान्य अपेक्षा आहेत. पण प्रत्येक ठिकाणी त्याच्या न्यूनत्वावर बोट ठेवले जाते. वास्तविक रूप काही त्याच्या हाती नव्हतं. पण नेमके तेच त्याच्या कर्तृत्वाआड येऊ लागले. शाळे-मध्ये टिकला असता तर मॅट्रिक पास होण्या-इतकी बुद्धी त्याला निश्चित होती, याची त्यालाही जाणीव होती. पण स्वतःच्या रूपावरूनच मारामारी केल्यामुळे त्याची शाळा सुटते, ती कायमची. मनातल्या मनात तो मनसुबे रचू लागतो पण ते प्रत्यक्षात मात्र येऊ शकत नाहीत. स्वतःशीच विचार करू लागतो–बोलू लागतो. तेच हे 'स्व–गत'. ह्या 'स्व–गता' द्वारेच शिवाची जीवनकथा आपल्यापुढे साकार होऊ लागते. शिवाच्या जीवनात अजाणतेपणाच्या काळात घडलेल्या घटनांचा मागोवा घेत असतानाच जाणतेपणी घडणाऱ्या– घडू पहाणाऱ्या घटनांचे धागेदोरे आपल्यापुढे विणले जातात. घडून गेलेल्या घटनेपैकी त्याच्या जीवनावर फार मोठा परिणाम करून गेलेली घटना म्हणजे त्याच्या वडिलांचे पळून जाणे. वडिलांच्या पळून जाण्यामुळे त्याच्यावर प्रेम करणारं माणूसच नाहीसं होतं. आईचं केवळ नातं होतं म्हणूनच ती त्याच्यापासून एकदम दूर जात नाही. पण त्याच्याजवळही ती कधीच आली नाही. त्यांच्यामध्ये एक प्रकारची दरीच निर्माण झाली. दोघांचं पोट भरण्याकरता तरी काहीतरी उद्योग केला पाहिजे यातूनच त्याची आई इतरांची किरकोळ कामे करू लागते. शाळा सुटलेल्या शिवाला कुठेतरी कामधंदा कर असं आग्रहाने सांगते.आपल्या-परीने शिवा नोकरीचा प्रयत्न करतो पण त्याच्या नशिबाने त्याला हवीशी वाटणारी नोकरी मिळत नाही आणि तो बेकार रहातो. पण आई ज्या ठिकाणी पोळ्या लाटण्याचे काम करते त्याच खाणावळीत हिशेब लिहिण्याचे काम त्याला मिळते; आणि इथून त्याच्या जीवनावर वेगवेगळे आघात होत रहातात. आपल्या वडिलांशी लग्न होऊनसुद्धा कधीच प्रेमळपणाने न वागलेली आई खाणावळवाल्याशी सूत जमवते. हे जेव्हा त्याला कळते तेव्हा त्याला राग येतो पण पोट त्याला बोलू देत नाही. संथपणे नि मुर्दाडपणे तो ते पाहू लागतो. त्याच्या मनात स्त्रीपुरुष संबंधाचे विचार इथूनच येऊ लागतात. जेव्हा स्वतःच्या शरीराच्या भुकेची जाणीव त्याला होऊ लागते तेव्हा इतरांप्रमाणे तोही सामान्य अपेक्षांची स्वप्ने रंगवू लागतो. पण ती प्रत्यक्षात येणे कठीण आहे याची जाणीव त्याला मोहिनी प्रकरण आणि कालिंदी-प्रकरणातून कळते. त्यातून त्याला बऱ्याच गोष्टींचे ज्ञान मिळते पण त्याच प्रकरणातून एका जुन्या दोस्तामार्फत त्याला पार्वतीबाय-कडे विडीच्या गादीवर काम मिळते. भोवतालच्या जीवनाकडे निरखून पहाणारा शिवा नकळत पार्वतीबायच्या जाळ्यात ओढला जातो आणि लग्नाशिवाय लग्नाचं सुख त्याच्यावर लादलं जातं. अशा विचित्र प्रसंगातून त्याचा जीवनप्रवाह वळणे घेत असतानाच आईचा मृत्यु होतो. तिच्या मृत्यूचं खरं कारण त्याला उमगतंही, पण तो काहीच करू शकत नाही. कुशाबापू त्याच्याजवळ तीनशे रुपये देऊन त्याला झटकून टाकतो. गरज संपल्यावर माणूस कशाला बाळगायचा या तत्त्वज्ञानाचा डोस त्याला मिळतो आणि त्याची नोकरी संपते. पार्वतीबायसुद्धा नवा छोकरा गाठून शिवाची उपेक्षा करू लागताच शिवाच तिथलं काम सोडून देतो. हेलकावे खाणारं







स्वतःचं जीवनं त्याला सावरताच येत नाही. त्याला आदर्शाचे धडे देणारे आणि ज्यांच्या-बद्दल थोडी श्रद्धा बाळगावी ते केणी गुरुजीही त्याचे उसने घेतलेले वीस रुपये परत करून आत्महत्या करतात. सगळीकडून जणु अंधारून येतं आणि दिशाहीन जीवन जगणारा आवा त्या अंधारात चाचपडत राहतो. शिवाचं 'स्व–गत' याठिकाणी संपतं. या 'स्व–गताची' ही सामान्य रूप-रेषा. जयवंत दळवींच्या प्रतिभेने यातील प्रत्येक तपशील इतका पारखून बारकाईने रंगविला आहे की शिवाचा हा संपूर्ण जीवनपट जीवंत होतो आणि प्रत्येक वेळेला शिवाच्या सुजाण मनात जे प्रश्न निर्माण होत रहातात त्याचा मानवी जीवनाच्या संदर्भातील अर्थ आपल्याला जाणवू लागतो.

शिवा हा वृत्तीनं दुबळा असेल पण तो विचारानं दुबळा नाही. वांझोटे विचार त्याच्या जीवनास उपयुक्त ठरत नसले तरी ते मूलभूत आहेत ही जाणीव जीवनाचे भयानक दर्शन घडवीत रहाते. या स्व-गताचे हेच वैशिष्टच मानावे लागेल. शिवा विचार करतो ती तऱ्हाही त्याच्या बुद्धीच्या पल्ल्यातील आहे. खास त्याचीच ती आहे.

शिवाच्या भोवतालच्या माणसातील काही नमुनेही मोठे मार्मिक आहेत. दुःखी जनतेला मार्गदर्शन करणारे पण स्वतःच मार्ग चुकलेले समाजसेवक रायाजी, लंपट शेटे, सरळ चाल नसणारे बाबूराव नाईक, वखवखलेली पार्वतीबाय, परि-स्थितीतून मिळणारे सुखाचे थेंब झेलणारी आई, गरज संपल्यावर लाथाडणारा कुशा-बापू, आशा न सुटलेली पेन्शनरांची चौकडी, आदर्शाचे दर्शन घडविणारे परंतु त्याचीच वाट चुकलेले केणी गुरुजी, ही सर्व माणसे शिवाच्या जीवनात येतात. त्याच्या जीवनाला जमेल तसा आकार देतात. पण तरीही त्यांच्यापासून तो दूरच रहातो. दुरून त्याना न्याहाळतो. त्यामुळेच त्यांचं एक वेगळं दर्शन त्याला घडू लागते. एक-मेकात गुंतून गेलेल्या विचित्र धाग्यांचं मूळ तो शोधत असतानाच वास्तवाचं वेगळं दर्शन घडवू लागतो. वास्तव जीवना-तील भयानकता नेमकी इथे जाणवू लागते.

जयवंत दळवींची भाषा या वास्तवाचे यथार्थ दर्शन समर्थपणाने घडवते. जाणवलेली आणखी एक गोष्ट – कादंबरीतील पात्रांचे संवाद. हे संवाद फार बोलके वाटतात. त्यातून जाणवणारी व्यथा हीच त्यातून साकार होऊ लागते. संवादाकरिता अवतरण चिन्हांचा वापर न करणे हीही एक लक्षात येण्यासारखी गोष्ट की ते 'स्व–गत' म्हणून?

'स्व–गत'चे मला जाणवलेले हे स्वरूप. जयवंत दळवींच्या विषयी अधिक अपेक्षा मनात निर्माण करणारं!

—श्रीहरी जोशी

(स्व–गत– जयवंत दळवी. 'मॅजेस्टिक' पृष्ठे १९० किंमत रुपये आठ)

### स्टेनोने उलगडलेले खुनाचे रहस्य

रहस्यप्रधान कादंबरीची ठराविक चाकोरी सोडून एका नवीन मार्गाने वाटचाल करण्याचा प्रयत्न 'कठ-पुतळीचा खेळ' ह्या कादंबरीत लेखकाने केला आहे; व तो बऱ्याच अंशी यशस्वी झाला आहे, असे म्हणावे लागते. ह्या कादंबरीत कथानक, घटना, पात्रे, संवाद, सर्वांनाच रहस्यमय व सामाजिक असे दुहेरी स्वरुप असल्यामुळे दोन्ही प्रकारच्या वाचकांची लोकप्रियता मिळविण्यात लेखकाला यश लाभले आहे.

कस्तुरी महालात घडलेल्या केशरच्या खुनाने कादंबरीस सुरुवात होते. एका कंपनीत स्टेनो म्हणून काम करणारे पण फुरसतीच्या वेळात डिटेक्टिव्हचे काम करण्याची आवड असणाऱ्या राजशेखर याना ह्या खुनामागे काहीतरी रहस्य असल्याची खात्री पटते व ते स्वखुशीने ह्या भानगडीत उतरतात – पोलिसानी उपेक्षिलेले धागेदोरे अत्यंत महत्त्वाचे ठर-विले जातात. खुनाशी संबंध असणाऱ्या निरनिराळ्या व्यक्तींच्या तोंडून सत्य वदविले जाते. जुन्या रहस्यप्रधान खट-ल्यांचा विश्वकोष काढला जातो. आणि कस्तुरी महालातील ही कस्तुरी म्हणजेच नाशिकच्या कृष्णकुटीरमधील केशर. ही केशर आपला बदफैली मावसभाऊ दाजी डेरे व त्याची सावत्र बहीण राधा












यांचेकडे आश्रयाला येऊन राहते. दाजीचा मित्र मुरलीधर याच्याशी तिचे सूत जमते. पण मुरलीधरने राधाशी विवाह करावा अशी दाजीची इच्छा असते. ह्या भानगडीत दाजीचा खून होतो व त्याचा आळ मुरलीधरवर येतो. त्याला जन्मठेपेची शिक्षा होते. केशर, राधा व दाजी ह्या दोघांच्या इस्टेटीची मालकीण होते. ह्या केशरने आपली इस्टेट आपली भाची गिरिजा हिच्या नावावर केलेली असते. अनंतकुमार नावाच्या एका खुशालचेंडूवर केशरची मर्जी असते व गिरिजाने त्याच्याशीच विवाह करावा अशी तिची अट असते. परंतु गिरिजाचे प्रेम मोहनवर (जो मुरलीधर मोटेचा मुलगा असतो) असते. मोहन हा चित्रकार असतो. खुनानंतर त्याची परदेशी जाण्याची तयारी सुरू होते. म्हणून तो ह्या खुनाचा संशयित गुन्हेगार म्हणून धरला जातो. त्याचप्रमाणे कस्तुरी महालाचे मालक धनाजी चौधरी हे खुनाच्या दिवशी रात्री थिएटरमधून घरी येतात. त्यामुळे दुसरे संशयित आरोपी म्हणून त्यांचा क्रमांक लागतो. ह्यातच कस्तुरीने सॉलिसिटरकडे ठेवलेल्या सुवक पेटीचे प्रकरण उपटते आणि मोहन हा मुरलीधरचा मुलगा असल्याचे व अनंतकुमार हा दाजी डेरे यांना अनैतिक संबंधापासून झालेला मुलगा असल्याचे उघडकीस येते. अनंतकुमारच्या कृत्रिम बोटाने तोही ह्या खुनास जबाबदार धरला जातो. त्यातच मोहनविरुद्ध लढविलेल्या केसमध्ये अनंतकुमार अॅलिबी देतो, व त्याच्यावरही वरील संशय द्विगुणित होतो. पुराव्यासाठी राजशेखरांची धडपड सुरू होते आणि धनाजीच्या खुनामुळे त्याला जास्तच चालना मिळते. खून करण्यासाठी आवश्यक हेतु, अनुकूल संधी व मनोवृत्ती हा फॉर्म्युला तिन्ही संशयिताना लागू केला जातो आणि त्यातूनच 'कठपुतळीच्या खेळा'चा प्लॅन राजशेखरांच्या सुपीक डोक्यात शिरतो. बाहुल्यांच्या साहाय्याने खुनाची सर्व कल्पना मांडली जाते व ह्यातूनच अनंतकुमारच हा खरा खुनी ठरला जातो.

कादंबरीच्या कथानकाची रचना अशा रीतीने आकर्षक, रहस्यमय, धावती व खेळकर करण्यात लेखकाने निश्चितच कौशल्य दाखविले आहे. कादंबरीतील प्रसंग, घटना, व्यक्ती, त्यांचे स्वरूप सामाजिक व रहस्यमय असे दुहेरी असल्याने कथानकास आकर्षकता प्राप्त झाली आहे. विशेषतः काही प्रणय-प्रसंगात कादंबरीतील नायिका हिन्दी चित्रपटातील नायिकेशी बरोबरी करीत आहे असे वाटते. रहस्यमय कादंबरीचे खरे कौशल्य नायकाच्या रहस्य उलगडण्याच्या बुद्धिमत्तेवर अवलंबून आहे. त्या दृष्टिकोनातून विचार केल्यास ह्या कादंबरीतील नायकास डोक्यास कमी त्रास देता इतर पात्रांकडून माहिती पुरविली जाते (कदाचित नायकाचे देखणे व्यक्तिमत्वही यास जबाबदार असेल) व त्यावरून नायक पुराव्याचे संकलन करतो हे एकंदरीत मनुष्यस्वभावासही विसंगत वाटते. मात्र काही रहस्यमय प्रसंग उदाः– चंदनाच्या पेटीतील डायरीचे रहस्य, अनंतकुमारच्या जन्माचे रहस्य, मुकिंदा माळी म्हणजेच मुरलीधर मोटे, साईबाबाच्या ताईताचे रहस्य वगैरे वाचकांची उत्कंठा वाढवितात व कथानकावरील वाचकांची पकड कायम ठेवू शकतात.

खुनाचा छडा लावणारे राजशेखर व या कार्यात त्याना मदत करणारी त्यांची प्रेयसी वैजू वाचकांची उत्तम प्रकारे मर्जी संपादन करतात. विशेषतः राजशेखरची कल्पकता व निरनिराळ्या व्यक्तींकडून सत्य वदवून घेण्याची त्यांची हातोटी वाखाणण्यासारखी आहे. अर्थात रहस्यप्रधान रहस्यमय कादंबरी ज्याना अजिबात आवडत नाही असे वाचकही हे पुस्तक एकदा हाती घेतल्यानंतर संपूर्ण वाचून झाल्याशिवाय खाली ठेवणार नाहीत हे निश्चित.

**—नीळकंठ देशपांडे**

(कठपुतळीचा खेळ. ले. **दीनानाथ** लाटे. मूल्य ५ रुपये)



## नायकाच्या मनात 'प्रक्षोभ' निर्माण करणारी कादंबरी

**श्री. य. बा. मोकाशी** यांची 'प्रक्षोभ' ही कादंबरी वेगळे कथानक, अद्भुत वातावरण, वेधक घटना आणि समस्याप्राधान्य ह्या सर्वच दृष्टीने एक वेगळ्या धर्तीची कादंबरी असल्याने वाचकांचे मन आकर्षून घेते यात शंका नाही. कादंबरीत मांडलेले राजकीय, सामाजिक प्रश्न जरी भूतकालीन असले तरी वर्तमानकालासही ते तितक्याच उत्कटतेने जाणवतील असे आहेत.

कादंबरीचा कालखंड १८९७ च्या आसपासचा आहे. कादंबरीचा नायक देवराम हा भामट्याच्या कुळात जन्मास आलेला पण सुशिक्षित असून आपला भामटेगिरीचा व्यवसाय टाकून उत्तम नागरिक होण्याची त्याची इच्छा आहे पण समाजाकडून झालेल्या अन्यायामुळे आपला मित्र रूपाजीच्या साहाय्याने तो भामटेगिरीच्या जीवनास प्रारंभ करतो. ह्या नवीन व्यवसायानिमित्ताने नायकाची भ्रमंती पुणे-कलकत्ता–झांशी–मुंबई इत्यादी ठिकाणी होते–अर्थातच त्या भ्रमंतीत त्याचे सुशिक्षित मन त्याच्याबरोबरच वावरत असल्याकारणाने प्रत्येक ठिकाणी त्याला भेटलेल्या विविध व्यक्ती, अनेक प्रसंगाना द्यावे लागलेले तोंड ह्या सर्वातून त्याचे साकार झालेले व्यक्तिमत्व हा या कादंबरीचा पाया आहे. पुणे येथील प्लेगमुळे व रॅन्डच्या खुनामुळे नायकाला झालेले मर्दपणा व भेकडपणा यांचे दर्शन, कलकत्ता येथे क्रांतिकारी आणि देशभक्ती यांचा

आलेला प्रत्यय, झाशी येथे असताना इंग्रजाना हाकून देण्याची आकांक्षा बाळगणारा आणि गरीबांचे राज्य स्थापण्याची ईर्षा बाळगणाऱ्या 'वेणीमाधव' ह्या बंडखोर माणसाची भेट, ह्या प्रसंगानी कातावलेला नायक गरीबांच्या सेवेत आयुष्य वेचण्याच्या इच्छेने मुंबईत दाखल होतो आणि मुंबईच्या कामगार विभागात लेखनिकाचा व्यवसाय पत्करतो. येथेच नायकाची पूर्वीची प्रेयसी चंद्रभागा त्याला भेटते. सुखाचे दोन क्षण त्याच्या आयुष्यात डोकावतात तोच प्रेयसीच्या बापाने केलेला खुनाचा आरोप स्वतःवर घेऊन नायकाची रवानगी विसापूरच्या तुरुंगात करून ब्रिटीशांच्या आमदानीतील तुरुंगाचे जीवन चित्रित करण्याची संधी लेखकाने साधली आहे. तुरुंगातील नायकाच्या बंडखोरवृत्तीमुळे त्याची शिक्षेची कालमर्यादा वाढते आणि अखेरीस नायक तुरुंगातून पळून जातो. त्यानंतर तो ग्रामीण भागात स्थायिक होण्याचा प्रयत्न करतो. पण येथेही खेडयातील प्रतिगामी विचारांच्या माणसाना कंटाळून आध्यात्मिक आणि आत्मिक तळमळीने नर्मदातीरी प्रस्थान करतो; परंतु तेथून परत लेखकाने नायकाची उचलबांगडी केली ती परत कलकत्त्याला क्रांतिकारक संघटनेत सल्लागार म्हणून! सशस्त्र बंड आधी की मानसिक उन्नती आधी ह्या प्रश्नावरून त्याच्या संघटनेतील इतर क्रांतिवाद्यांशी वाद होतो आणि नायक परत देशोधडीला लागतो — मध्यंतरीच्या सुमारास नायकाचा मित्र रुपाजी याचे चंद्रभागेशी लग्न झालेले असते पण योगायोगाने नायक त्याच गावात येतो आणि चंद्रभागेची ओढ अद्याप आपल्या मित्राकडेच आहे हे रुपाजीला कळून आल्याने तो गाव सोडून जातो. ('संगम'ची आठवण)—नायक व त्याची प्रेयसी यांची पुरामध्ये ताटातूट होते. पूर्वाश्रमीचे जहाल पण नंतर मवाळ झालेले माधवराव यांच्या आश्रमात त्यांची गाठ पडते आणि कादंबरी संपते.

वातावरण निर्मितीच्या बाबतीत श्री. मोकाशी हे अधिक यशस्वी ठरतात. प्लेगचा कहर, रँण्डचा खून, विसापूरच्या तुरुंगातील जीवन, वेणीमाधव शास्त्रीकृत बंड, बांबवाल्यांची संघटना, ग्रामीण व कामगार जीवन यांचे वर्णन करण्यात लेखकाने कौशल्य दाखविले आहे. गतस्मृतीना त्या परत उजाळा देतात. त्या प्रसंगातून निर्माण झालेल्या समस्या आणि यामुळे नायकाच्या मनात उद्भवलेला 'प्रक्षोभ' उत्तम रंगविला आहे. विशेषतः जहाल आणि मवाळ विचारसरणीचे द्वंद्व हा त्या कादंबरीचा मध्यवर्ती बिंदू आहे. त्या संदर्भात लो. टिळक आणि म. गांधी वाचकांच्या डोळ्यासमोर उभे राहतात.

कादंबरी वाचून त्यातील नायकाप्रमाणे वाचकांच्या मनातही 'प्रक्षोभ' निर्माण झाला असता तर लेखक अधिक यशस्वी ठरला असता पण तसे होत नाही असे नाईलाजाने म्हणावे लागते. त्यातील योगायोग, अद्भुतता, रहस्यमयता हेच अधिक परिणामकारक वाटतात अर्थात कलेच्या दृष्टीने यात वावगे नाहीच.

**—नीळकंठ देशपांडे**

(प्रक्षोभ. य. बा. **मोकाशी.** इनामदार वंधू प्रकाशन, पुणे. मूल्य ८ रुपये)

(पान १० वरून—**धन्य ते...**)

पूर्णा (कथेत ही सरस्वती आहे— नाव कां वरे बदलले? चरित्र नाटचात अशी नावे बदलावी काय?) ही तानसेनची मुलगी. त्या मानाने वाव कमी. आहे तो गायकीपुरताच. तो ती चांगला सादर करते. भारती वर्मा प्रथमच रंगमंचावर येत आहेत असे न वाटण्याइतपत सहजसुंदर अभिनय त्यांनी सादर केला आहे. दिवाकर जठार (दिवाकर पंडित) कृष्णराव चोणकर (मदनराय) श्रीपादराव नेवरेकर (सोमनाथ) यांनी कामगिरी चांगली बजावली चोणकरांचा मदनराय दीर्घकाळ स्मरणात राहील. राजा रामचंद्र (भिकु पै आंगले) या भूमिकेत वाव थोडा. भूमिका बरी झाली (पण बरी दिसली नाही— असे कां?)

पं. भीमसेन जोशी ह्यांच्या संगीत दिग्दर्शनाबद्दल येवढेच म्हणता येईल की त्यानी अनेक रागरागिण्यांच्या अलंकारांनी 'तानसेन' सजविला आहे. ते राग चांगले आहेत. श्री. कामत व व कु. वर्मा त्यांना न्याय देतात. नेवरेकर—चोणकर रंगतीत भर घालतात. खानदानी संगीत शौकीनांना ही मैफल आवडेल. पण गळचात व मनात घोळतील व घरोघरी पोहचतील अशा काही चाली असत्या तर सामान्य प्रेक्षकांचेही समाधान झाले असते. निदान 'पूर्णा'च्या गाण्याना असे रूप देता आले असते. तरीही पण जाणकार गानरसिकांना बागेश्री, दरबारी कानडा, दीपक, मेघमल्हार आदि रागांनी समाधान लाभेल. कामत नुसते गात नाहीत— ते अभिनयही करतात. ह्याचा प्रत्यय तानसेनमध्ये मिळतो. रामदास कामत अपेक्षा वाढवतात.

रघुवीर तळाशिलकर या सिद्धहस्त नेपथ्यकाराची किमया दुसऱ्या, तिसऱ्या अंकात अधिक पहायला मिळते. 'दीपक'—मल्हार'च्या वेळची प्रकाशयोजना हे श्याम आडारकर यांचे मोरपीस. एकूण ह्या दोघा कलाकारांची कामगिरी तशी चोख!!

श्री. मो. ग. रांगणेकरांनी नाटक छान बसवले आहे. भारती वर्मा ते चोणकरांपर्यंत प्रत्येकाला चांगले व्यक्तित्व देण्यात ते यशस्वी झाले आहेत. नाटक कुठेही 'संथ' वा मंद झालेले नाही. त्या मानाने 'वृंदावना'चा प्रवेशच काय तो फिका पडतो. पण ते काहीसे अपरिहार्य म्हटले पाहिजे.

गोवा हिंदु असोसिएशनच्या कलाविभागाने हे संगीतप्रधान चरित्र—नाटच रंगमंचावर आणून एक नवे पाऊल टाकले आहे. भीमसेन मिळवले आहेत. भारती वर्मा मिळविल्या आहेत. चोणकरांना 'रंगती'त साधले आहे. व गोपाळकृष्ण भोबे ह्यांच्या मृत्यूनंतर हे नाटक दिमाखात रंगमंचावर आणून त्यांच्या स्मृतीना कायमचे कलारूप देण्याचा जो प्रयत्न केला आहे त्याबद्दल अभिनंदन करतो.

**—चित्रगुप्त**



## एक नवे पाकिस्तान वाट चालत आहे

'युद्ध नको ' करार करू या अशी विनंति पंडित नेहरूंपासून ते थेट पंडित पुत्री इंदिराजीपर्यंतच्या साऱ्या भारतीय पंतप्रधानानी आपल्या (तथाकथित) छोटे भाईना वारंवार केली. पण "युद्ध हवे" "युद्धच हवे " अशी मनोधारणा जन्मापासून ( खरं तर जन्मापूर्वीपासूनच) जपलेली असल्याने ' युद्ध नको ' कराराची वासलात थोड्याफार वर्षाच्या अंतराने कच्छ–काश्मीरच्या रणमैदानावर युद्ध करूनच लावण्यात आली. ह्या विषयात पाकिस्तानच्या राज्यकर्त्यांच्या ( मग ते पैगंबरवासी जिन्हा असोत वा हुकुमशहा अयुब असोत) मनात हेतूंविषयी भ्रम नव्हते. स्वप्नरंजन नव्हते. भ्रम, स्वप्नरंजन, शंका, ज्या काही होत्या, त्या आमच्या राज्यकर्त्यांच्या मनात त्यामुळे ' हिंदुस्थानचे अस्तित्व ' आव्हानित करणाऱ्या, त्याला चूड लावणाऱ्या, त्याला खिळखिळे करणाऱ्या, त्याला सतत युद्धमान स्थितीतच ठेवणाऱ्या सर्व गोष्टी पाकिस्तानने सतत केल्या आहेत. होऊ दिल्या आहेत. त्याना सतत खतपाणी घातले आहे असेच गेल्या वीस वर्षांचा इतिहास सांगतो. ज्यावेळी आम्ही 'युद्ध नको ' कराराची आवाहने करीत असतो त्याच वेळी काश्मीरमध्ये घातपाती कृत्ये करणारांचे कट उघडकीस येत असतात आणि दक्षिणेत 'लाल ' कृपेने आमचे भारतीय लीगी बांधव एक लहानसे पाकिस्तान निर्माण करण्याचा चतुर डाव टाकीत असतात. इतर लहानसहान प्रयत्न तर चालू असतातच. रांची येथे हेव्ही इंजि. कॉर्पोरेशनचे अध्यक्ष कॉमरेड ( त्यांचा रंग आता स्पष्ट झालेला असल्याने हे म्हणण्याचे धाडस करतो ) केशवदेव मालवीय यांच्या कृपेने तेथील मुसलमान कर्मचाऱ्यांसाठी म्हणून वेगळी वसाहत वहाल करण्यात येत आहे. ( राष्ट्रीय एकात्मता झिंदाबाद ) भारताच्या फाळणीपूर्वीचा इतिहास अजून विसरण्याइतका जुना झाला असे मला वाटत नाही. ह्या व अशाच मार्गाने 'फाळणी' चालत आली. आणि रक्ताचा थेंबही न सांडता स्वराज्य आले म्हणणारांच्या नाकावर टिच्चून एक महान वंशविच्छेद घडला. इतिहासातून माणसे ज्ञान मिळवितात असे म्हणतात. पण आज राष्ट्रीय एकात्मतेची जपमाळ ओढीत व त्या तत्वांचा जयजयकार करीत आम्ही पुन्हा मुस्लिम अनुनयाचे फाळणीपूर्व राजकारणच खेळत आहोत असे पाहिले की इतिहासापासून आम्ही काहीही शिकलो नाही असेच नाईलाजाने म्हणावे लागते. सरकारी कृपेने हा अनुनय चालतो तेव्हा तर मति कुंठित होते. दंगे झाले की तात्पुरत्या समित्या स्थापन होतात. परिषदा घेतल्या जातात. मोठमोठी सरकारी फर्माने निघतात आणि मग पुन्हा जुनाच ( व जीवघेणा ) खेळ सुरू होतो.

केरळ प्रांती तूर्त 'लाल' राजवट चालू आहे. केंद्र सरकारच्या कर्मचाऱ्यांच्या संपाच्या वेळी दिल्लीकराना आव्हान देऊन कॉमरेड नंबुद्रीपाद यानी आपली ताकद जणु अजमावण्याचा एक प्रयोग करून पाहिला. लोकशाही मार्गाने ह्या देशात राज्य मिळविण्याची 'सोय' असल्याने लाल माणसे तिचा जयजयकार करताना दिसतात.पण मनातली स्वप्ने मात्र अंतिम लढ्याचीच असतात असे सतत दिसून येते. नावे निरनिराळी घेतली असली तरी डावे–अति डावे–उजवे व नक्षलाइटस् यांचे हेतु कधी लपणे नाहीत. 'सत्ते'च्या सहाय्याने, लोकशाही मार्गाने व क्रांतीच्या विध्वंसक मार्गाने – जसे जमेल तसे 'आपली' राजवट ह्या देशात प्रस्थापित करण्याचे मनसुबे ते रचीत असतात. 'सत्ता ॲट ऑल (अँड एनी) कॉस्ट ' हे ब्रीद मनी बाळगूनच सारी पावले पडत असतात. देशाचे हित ही गोष्ट नेहमीच गौण मानली गेली आहे. अंतिम सिद्धीच्या मार्गावर असताना हातची सत्ता न गमावणे हे सूत्र केरळातली राजवट पाळीत आली आहे. त्या सत्तेतले एक महत्त्वाचे प्यादे म्हणून केरळातली ' मुस्लीम लीग ' पुनरुजीवित करण्यात आली. 'सौदा' हा तिने नेहमीच 'धर्म' मानला जाहे. ( म्हणून तर पाकिस्तान घडले ) त्या धर्मांचे पालन करीत करीत आता 'नंबुद्री' कृपेने तिने एक महत्त्वपूर्ण डाव रचला आहे. तो डाव म्हणजे 'मोपलास्तान'ची निर्मिती हा होय. मोपलास्तान म्हणजे केरळातले लघु पाकिस्तान होय. भारतीय राज्य घटनेनुसार जर सारे ' भारतीय ' व म्हणून ' समान' असतील तर 'मुस्लिम बहुसंख्ये'चा विचार संभवतोच कुठे ? पण कम्युनिस्टाना कसेही (व काहीही करून ) राज्य टिकवायचे असल्याने त्याना ही कृपादृष्टि ठेवणेच भाग झाले आहे. ह्या ठिकाणी मूलभूत प्रश्न कोण विचारात घेणार ? आणि असे वेगळे जिल्हे बनविण्याने येणाऱ्या संकटपरंपरेचा विचार तरी कोण करणार ? अर्थातच राजकारणात मनातले हेतु आणि मुखातले हेतु ह्यात नेहमीच अंतर असते. येथील निधर्मी राजवटीत ' मुस्लिम जिल्हा ' हा शब्दप्रयोग केला की उगीचच दिल्लीकर अस्वस्थ होतील ह्याची जाण चाणाक्ष व राजकारणी मुस्लिम लीगला असल्याने राज्यव्यवहार व विकासाची सोय अशी 'व्यापक ' भूमिका तिने घेतली आहे. वास्तविक जिल्ह्याची व्याप्ति व विकासाचा वेग ह्याचा अन्योन्य संबंध काय ? दुर्लक्षच केले वा झाले तर एखादा लहानसा भूभागही अविकसित राहू शकतो. केरळातील अलेप्पी हा सर्वात लहान आणि सर्वात अविकसित जिल्हा आहे. मग ह्या नव्या 'मल्लापुरम '

जिल्ह्याची गरज ?– मुस्लिम लीगची गरज ( आणि पाकिस्तानचीही गरज ) हेच त्याचे उत्तर आहे. पाकिस्तानने एक किनारपट्टीचे आरमार उभे केले असून त्यात दहा हजाराच्या वर केरळी मुस्लिमांची भरती केली आहे ही वार्ता आणि 'मल्लापुरम' जिल्ह्याची निर्मिती ह्यांचा काही अन्योन्य संबंध आहे की नाही ? मलबारी मोपल्यांच्या १९२२ साली झालेल्या बंडाची कथा तशी जुनी झाली नाही. ती कथा १९४७ साली पुनरावृत्त झाली आणि आता केरळात जर केवळ 'धर्म' विचार प्रधान मानून जर जिल्हा निर्मिती झाली तर एक वेगळेच अंतर्गत आव्हान आपण निर्माण करीत आहोत ही गोष्ट केरळ शासनाने व पर्यायाने केंद्र शासनानेही ध्यानी घेणे अगत्याचे आहे. " हमे यह कल्पना न थी " असे मागाहून म्हणायचे आणि विध्वंस वा संहार पहायचा आणि मग " झालं गेलं विसरून जा " म्हणायचं ही ( दुष्ट ) परंपरा संपणे अगत्याचे आहे. भारतीय घटनेचाही हा अवमान आहे. कारण पाक निर्मितीनंतर इथे फक्त 'भारतीय प्रजासत्ताक ' अस्तित्वात आहे. इथे कुणीही मुसलमान, ख्रिस्ती, हिंदु, पारशी यहुदी नाही. सारे ह्या देशाचे नागरिक अतएव समान आहेत. ह्या बाबतीत ताठ कण्याने भारतीय शासन उभे राहील अशी आशा करतो.

## ' दारूबंदी ' अधिवेशन

अ. भा. काँग्रेसचे अधिवेशन नुकतेच गोव्यात भरले. काँग्रेसचे अधिवेशन हे नुसत्या एखाद्या पक्षाचे अधिवेशन नसते. ते शासनाचे, शासनाच्या पाठीशी उभ्या राहणाऱ्या व प्रसंगी स्वतःचे निर्णय शासनावर लादू शकणाऱ्या पक्षाचे अधिवेशन म्हणून त्याला दुहेरी महत्त्व असते. पण गोव्यात झालेले काँग्रेसच्या महासमितीचे अधिवेशन फार फार गाजले व महत्त्वपूर्ण ठरले असे अध्यक्ष निजलिंगप्पा यांचे मत असले तरी ( अध्यक्षाला वा नेत्याला असे बोलत रहावेच लागते म्हणा ) त्या अधिवेशनाची एकूण कमाई शून्य व गमाई मात्र काही लाखांची होती असेच म्हणणे तर्कसंगत ठरेल. काँग्रेसने राज्य स्वीकारण्यापूर्वीपासून काँग्रेस 'दारूबंदी'च्या धोरणाला बांधलेली होती. आणि स्वराज्य आल्यावर दारूबंदीचे धोरण अंमलात आणण्याचा यथाशक्ति प्रयत्न शासनाने केला. गेल्या निवडणुकीपर्यंत सर्व प्रांतात काँग्रेसला अनिर्बंध शासनाचा अधिकार होता. तरीही ह्या विषयीचे धोरण एकूण फसले असेच म्हणणे भाग आहे. आताची स्थिती वरीच वेगळी आहे. काँग्रेस वा गांधीजी यांच्या स्वप्नरंजनाशी ज्यांचे काहीही नाते नाही अशा काहींची राजवट काही प्रांतातून चालू आहे. अशा परिस्थितीत काँग्रेसने 'दारूबंदी' हा महत्त्वाचा व तातडीचा प्रश्न मानून गोव्यात ( गोव्यात हं ! ) जो गदारोळ घातला तो राजकीय अपरिपक्वतेचाच म्हणावा लागेल. ( किंवा ढोंगबाजीचाही म्हणावा लागेल. बापूंची आठवण आता आली काय ? शताब्दीच्या वेळी ? ) वास्तविक देशापुढे अनेक महत्त्वाच्या व गंभीर समस्या असताना 'दारूबंदी'विषयक गदारोळ करण्याचे व एक थातुर मातुर ठराव करून आपापसातील मतभेदांचे प्रदर्शन स्थगित करण्याचे काय प्रयोजन होते ? खुद्द काँग्रेसच्या हातातील प्रांतांचे सुद्धा ह्या विषयावर एकमत नाही ( हे साऱ्यांना ठाऊक आहे–अगदी मोरारजींनासुद्धा ) मग मुद्दाम हाच विषय ' मेजर इश्यू ' करून वादावादीत वेळ व लक्षावधी रुपये घालविण्यात काँग्रेसने साधले काय ? आता सात वर्षांचा नवा वायदा ( सीमा प्रश्नाला वायदा, दारूबंदीला वायदा – अखेर हे वायदेच फार ) देण्यात आला आहे. ( आज तर सुटलो असे म्हणत सारेजण गोव्यातून परत आले असे ऐकतो ) नवा घोळ — आजचे मरण उद्यावर—हीच वृत्ती ह्याही प्रश्नात दिसून आली. साऱ्यांनी आपापली ठाम मते तणतणून मांडली ( नवीन काय ? त्यासाठी अधिवेशन कशाला ? ) आणि 'जाऊ द्या झालं' असं म्हणत एक ' इनोसंट' ठराव पास केला.

म. गांधी जन्मशताब्दीच्या निमित्ताने जो ठराव संमत करण्यात आला आहे तोही असाच भोंगळ व इनोसंट आहे असे म्हणता येईल. अस्पृश्यतेचे निर्मूलन करणे, प्रत्येक खेड्यात पिण्याच्या पाण्याची सोय करणे, राष्ट्रीय एकात्मता निर्माण करणे, ग्रामोद्योगाला प्रोत्साहन देणे, गांधी तत्वज्ञानाचा प्रसार करणे वगैरे गोष्टी त्या ठरावात अंतर्भूत करण्यात आल्या आहेत. स्थूल रूपाने व सूत्ररूपाने ह्या गोष्टीबाबत कुणाचा मतभेद असण्याचे कारण नाही. पक्षीय राजकारणाच्या कक्षेच्या अतीत व भारतीय राज्यघटनेने पुरस्कृत केलेल्याच ह्या गोष्टी असूनही स्वराज्य प्राप्तीनंतर वीस वर्षांनी अजून एतद्विषयक ठराव करावे लागतात ही गोष्ट काय




दारूबंदी प्रश्नावर डॉ. सुशीला नायर यांनी राजीनामा दिला








अनुक्रमणिका

सुचविते? 'अस्पृश्यता' हा तर कलंकच. पण केवळ 'कायद्या' चे संरक्षण देऊन हा विषय सोडविता येत नाही हेच अलिकडच्या काही 'भयानक' गोष्टींवरून सिद्ध झाले आहे. हा विषय सामाजिक क्रांतीचा आहे. आणि आमचे सारे जीवन 'राजकीय' क्रांतीने ( वा तिच्या विचाराने ) खाऊन टाकले असल्याने ह्याविषयी म्हणावे तसे महत्त्वपूर्ण काही घडले नाही. ठरावाने आपण नेमके काय करू असे सूचित होत नाही. त्यामुळे ह्या ठरावाबाबतही 'वेळ मारून नेणे' ह्यापलीकडे काही साधले नाही असेच म्हणावे लागते. 'राष्ट्रीय एकात्मता' हाही एक असाच परवलीचा ( व तोंडी लावण्याचा ) विषय झाला आहे. आणि ज्या पद्धतीने तो हाताळला गेला वा जात आहे त्यामुळे तर तो काही दिवसानी टिंगलीचाही विषय होण्याची भीती वाटते. ह्याही बाबतीत "प्रत्ययी पाहिजे" असे बजावण्याची वेळ आली आहे. भ्रम नकोत. स्वप्नरंजन नको. नुसते शब्द ( वा ठराव ) नकोत. प्रत्यय हवा. हेतु शुद्ध हवेत. मन साफ हवे. तसे जोवर घडत नाही तोवर दारूबंदीपासून ते एकात्मतेपर्यंतचे सारे प्रश्न तसेच लोंबकळत राहतील. सीमा-प्रश्नावर निघालेल्या मोर्चाच्या नेत्यांची इंदिराजींनी अशीच निराशा केली व पंडितजी—पंतांचाच, 'काळ काढू' वारसा आपण 'तस्साच' सांभाळणार आहोत ह्याचा प्रत्यय दिला. 'शब्द' हे एकच शस्त्र तूर्त आपल्या हाती आहे ह्याची अगतिक जाणीव त्या आश्वासनात होती. 'समस्या' पेलण्याची व सोडविण्याची हिंमत अभावानेच दिसली. 'दारूबंदी'च्या गदारोळात लक्षावधी रुपये खर्च करून 'महत्त्वपूर्ण व दूरगामी परिणाम करणारे ठराव पास करून ( इति निजलिंगप्पा ) हे अधिवेशन संपले. मोरारजी, नायर (सुशिला) खपल्या व शेवटी खचल्याही ! अनुभवानेही आम्ही वास्तवाच्या जवळ जायला तयार नाही. असे कां ?

## हे 'राजकारणी' अड्डे

उत्तर भारतातल्या बनारस, अलाहाबाद वगैरे विद्यापीठातील विद्यार्थ्यांच्या आंदोलनासंबंधी येणाऱ्या वार्ता उगवत्या पिढीच्या भवितव्यासंबंधी व एकूण शिक्षणविषयक भवितव्यासंबंधी अस्वस्थ करणाऱ्या आहेत असेच म्हणावे लागेल. विद्यापीठे ह्या स्वायत्त संस्था आहेत. त्यांचे कार्य प्रामुख्याने शिक्षणविषयक आहे. असायला हवे. पण 'राजकारणमय' झालेल्या आमच्या एकूण राष्ट्रजीवनात विद्यापीठांचे हे पवित्र स्वरुप दुर्दैवाने कायम राहिलेले नाही. तिथेही आज 'राजकारणी' अड्डे झाले आहेत. स्वराज्याच्या चळवळीपासून विद्यार्थी वर्ग हा राजकारण व तत्संबंधीच्या चळवळीत अग्रभागी रहात आला असून आताच्या पक्षीय ( वहु ) राजकीय आंदोलनांचा तो शिकार झालेला आहे असे दिसते. 'फी वाढ' वगैरे गोष्टींबाबत होणारी आंदोलने समजण्यासारखी आहेत. पण उपकुलगुरु वा रेक्टर ( वा प्राध्यापक वगैरे ) यांच्या अस्तित्वाला वा अधिकारालाच आव्हाने दिली जातात तेव्हा मात्र ते समजेनासे होते. उद्या 'हीच पुस्तके असावीत' हेच प्राध्यापक असावेत. इतके ( व हेच ) विषय असावेत. इतकीच फी असावी. ती इतक्याच हप्त्यानी घ्यावी. वगैरे हट्टही विद्यार्थी करू लागतील व 'राजकारणी,' पुढारी ते हट्ट हेच आपले भांडवल समजून त्यात भाग घेऊ लागतील. त्यासाठी 'हिंसक' आंदोलने करू लागतील. घेराव, विटा फेकणे, मोटारी अडविणे वगैरे प्रकार मग 'धर्म्य' ठरतील. — पण हे थांबले पाहिजे. तरुण पिढीला 'एक्सप्लॉइट' करणाऱ्या सर्वच पक्षांच्या नेत्यानी ह्या बाबत आता एकत्र येऊन विचार-विनिमय करण्याची गरज आहे. 'राजकारणा'चा विद्यापीठांवर प्रभाव पडला ( वा पडू दिला गेला ) तर सारी शिक्षणयंत्रणाच कोसळणार आहे ह्याची गंभीर दखल घेण्याची वेळ आली आहे. शिक्षणावरचे हे राजकारणी दडपण कायद्याने थांबविले गेले पाहिजे. शासनाचे दायित्व नाकारता येणार नाही. लोकसभेत वा विधानसभेत कुणी बसावे हे फार तर निवडणुकीने ठरविता येईल. पण उपकुलगुरु कुणी व्हायचे वा रेक्टर कुणी व्हायचे हा विषय काही 'जनते'च्या ( राजकारणी ) कार्यकक्षेत येत नाही. येऊ दिला जाता कामा नये. गैर ( असल्यास ) कारभाराची चौकशी जरूर व्हावी. अपराध्याना शासन व्हावे. पण विद्यार्थ्यांचा 'हाय् हॅण्डेडनेस' मात्र चालू दिला जाऊ नये. पक्षीय राजकारण्याना तर विद्यापीठाच्या कक्षेतून हद्दपार केले पाहिजे —प्रसंगी कायद्याचा वापर करून सुद्धा ! ही बेदिली, बंडखोरी हे नव्या भारताच्या दृष्टीने तर महान संकट आहे – चार बंडखोरांसाठी चारशे वा चार हजार संशोधक अभ्यासकांचे नुकसान करण्याचा राजकारणी पक्षपात्याना अधिकार नाही. त्याना तो मिळता कामा नये. विद्यापीठांतल्या राजकारण्याना 'चलेजाव' सांगण्याची वेळ आली आहे असे मला वाटते.

— सारस्वत




'बोलर आऊट'

वटहुकुमावर केंद्र सरकार व केरळ सरकार यांची खडाजंगी चालू आहे !

## क्रिकेटची पानपुरी




### क्रिकेटचा उगम

क्रिकेटचा खेळ १८ व्या शतकात सर्वश्रुत झाला हे खरे पण त्यापूर्वी २०० वर्षे तरी या खेळाची लोकाना माहिती होती. इंग्लंडमधल्या सरे परगण्यातील गिलफर्ड गावच्या ऐतिहासिक दफ्तरात असा पुरावा सापडतो की इ. स. १५९६ साली म्हणजे राणी एलिझाबेथच्या वेळी गिलफर्डच्या शाळेतील मुले क्रिकेट नावाचा खेळ खेळत असत. क्रिकेट हा शब्द जिओव्हानीफ्लोरियो नावाच्या एका सुशिक्षित गृहस्थाने लिहिलेल्या " world of words " या पुस्तकात प्रथम सापडतो. हे पुस्तक इ. स. १५९१ च्या सुमारास लिहिले गेले, त्यात फ्लोरियोने Sjittre किंवा Squillas३ म्हणजे Cricket सारखा आवाज करणे, विकेटवर क्रिकेट खेळणे, आनंद करणे असा अर्थ दिला आहे.

● ●

एकेकाळी या क्रिकेट खेळाची बैलाच्या व अस्वलाच्या टक्करीच्या खेळाबरोबर तुलना करण्यात येत असे. पहिल्या जेम्स राजाने १६१८ साली, "Declaration of Sports" मध्ये क्रिकेटचा उल्लेख केला असे काहीचे म्हणणे आहे पण ते साफ चुकीचे आहे. केवळ क्रिकेटसाठी मैदान राखून ठेवण्याचा प्रयत्न १६६१ साली झाला. ते मैदान स्मिथफिल्ड नावाच्या ठिकाणी होते.

### क्रिकेटमध्ये पैज, फिडल व दारू

सुप्रसिद्ध इतिहास लेखक प्राध्यापक जी. एम. ट्रेव्हेलियन यानी आपल्या " सोशल हिस्टरी ऑफ इंग्लंड " या ग्रंथात एके ठिकाणी लिहिले आहे, " आपल्या शेतकऱ्यासमवेत जर फ्रेंच जमीनदारानी क्रिकेटचा खेळ खेळला असता तर त्यांचे किल्ले भस्मसात झाले नसते." ही गोष्ट १८ व्या शतकात घडली. त्याकाळी इंग्लंडमध्ये हा खेळ फार लोकप्रिय झाला होता व राव, रंक, धर्मोपदेशक आपले सामाजिक भेदभाव विसरून खेळाच्या नियमाखाली समानतेने खळत. खेळ गावच्या हिरवळीवर होत. ते पहाण्यासाठी गावकरी, त्यांच्या बायका व मुले जामावाने येत व आपल्या आवडत्या खेळाडूना टाळ्या पिटून उत्तेजन देत आणि सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्रत्येक खेळाडूवर पैज-पैसा लावीत. त्यावेळी बॅट, बॉल व स्टंप्स यांचे आकार निराळे होते व खेळाडूंचे पोषाखही त्या काळाला अनुरूप आणि अनुसरून असेच असत. क्रिकेटसंघ आपल्याबरोबर आपला फिडल वादक आणीत. खेळ बहुधा रविवारी होई. क्रिकेटच्या खेळाला बॅट, बॉल व स्टंप्स् जसे आवश्यक तसेच पैज फिडल व गाणे आणि दारूचा प्याला आवश्यक समजला जाई.

### क्रिकेटचा खेळ की जुगार ?

लंडनजवळील क्लॅपहॅम कॉमन मदानावर १७०० साली दोन दिवसाचा सामना झाला त्यावेळची एक सूचना अशी होती, " सभ्य लोकाना व ज्याना क्रिकेटचा खेळ फार आवडतो त्याना असे कळविण्यात येत आहे की १०–१० खेळाडूंच्या दोन संघांमध्ये एक सामना खेळला जाईल व त्यासाठी प्रत्येकी १० पौंड पैज घेण्यात येईल. ही पैज प्रत्येक खेळाची होय. पैज जिंकणाऱ्यास २० पौंड मिळतील." पुढे खेळाची लोकप्रियता वाढल्यावर प्रत्येकी अडीच शिलिंग पैज घेण्यात येऊ लागली. पण १७४० च्या सुमारास क्रिकेट जसा फॅशनेबल झाला तशी पैजेची रक्कम पुन्हा वाढू लागली व हा आकडा १००० पौंडापर्यंत गेला. एका सामन्यासंबंधी सांगण्यात येते की प्रेक्षक व खेळाडू यांच्यात ज्या इतर पैजा लागल्या त्यांची किंमत २०,००० पौंडापर्यंत गेली होती! क्रिकेटवरचा हा जुगार इतक्या थराला गेला होता की १९ व्या शतकाच्या आरंभी क्रिकेटच्या खेळालाच धोका आला. हा खेळ जुगारीसाठीच खेळला जात आहे अशी समजूत पसरली. प्रत्येक सामन्याच्या वेळे स घोड्यांच्या शर्यतीसारखे वातावरण दिसू लागले. परिणामी संघातील खेळाडू प्रेक्षकांकडून लाच घेऊ लागले. एका प्रसिद्ध खेळाडूने सामना हरण्यासाठी १००पौंड घेतल्याचा पुरावा आढळतो. एम. सी. सी. चा–मेरिलीबोर्न क्रिकेट क्लबचा–अधिकार सर्वत्र मान्य होईतोपर्यंत हे लाचलुचपतीचे प्रकार उघड उघड चालू होते. व्हिक्टोरिया राणी गादीवर आली त्यावेळी म्हणजे सुमारे ११८ वर्षापूर्वी क्रिकेटमधील जुगार संपुष्टात आला व एम. सी. सी. चे राज्य सुरू झाले. क्रिकेटचा पहिला क्लब–हॅम्बलडन क्लब ( १७५०–९२ ) देखील प्रत्येक सामन्यावर ५०० पौंड पैज लावीत असे.

—सदानंद चेंदवणकर

(पृष्ठ ८ वरून–टोबॅगो)

a little Land' हे गीत स्वरावले. स्टील बॅण्डची ही जन्मकथा आहे. आज हे वाद्य संगीत म्हणजे बेटांच्या हृदयाचे स्पंदन असून कोणत्याही मेळ्याची–उत्सवाची त्याच्या शिवाय कल्पनाच करता येत नाही– आणि या संगीताशिवाय त्रिनिदाद यथार्थच होत नाही.

**कार्निवल** : World's Greatest Show

त्रिनिदादसंबंधी लिहायचे आणि तेथील मोहमय, गतिमय व लावण्यमय 'कार्निवल'चा उल्लेखही करावयाचा नाही म्हणजे एखादे नयनमनोहर रंगीत तैलचित्र अपुरे ठेवण्यासारखे आहे. व तसे करणे म्हणजे सीतेचा उल्लेख न करता रामायण सांगितल्यासारखे अक्षरशः होईल. कार्निवल हा एक वार्षिक समारोह खरा पण तो सर्व दृष्टीने देशोदेशींच्या परंपरेच्या संदर्भात जितका वेगळा तितकाच नाविन्यपूर्ण व भुरळ पाडणारा होय. तो अतुल व अजोड आहे. तो पाश्चात्यांचा ख्रिसमस नाही किंवा हिन्दूंची दिवाळी नाही. त्याला विशिष्ट धर्माचे अवगुंठन नाही. त्याच त्याच गोष्टींची त्यात कंटाळवाणी पुनरावृत्ती नाही. त्रिनिदादकरांच्या व्यक्ति व समष्टि जीवनाचा तो एक अनिर्बंध व मुक्त, किंबहुना स्वैर आविष्कार आहे. व्यक्ति व समाज यांच्या उत्सवप्रियतेचा व उत्साहाचा त्यात मेळ आणि संमेलन आहे. त्रिनिदादकरांची त्यात जी अस्मिता व्यक्त व प्रदर्शित होते त्यात वैयक्तिक व समूह जीवनांचा एक अपूर्व व धुंद संगम अविस्मरणीय झाल्याचे प्रत्ययास येते. प्राणीमात्रातल्या उच्छृंखल क्षमतेच्या उन्मादक वृत्तींना वाव देणाऱ्या व ते चेतावणाऱ्या अशा या जुलूस व जलशात कल्पनेची भरारी आहे. भावनेचे काव्यमय स्पंदन आहे. जवानीच्या जोषाची काव्याशी वेंछुट सलगी आहे. ते एक आगळे नृत्य आहे जे की पाहात राहावे, त्यात वाहत जावे व पुढे हरवूनही जावे. या सर्वाला साग्रसंगीत करणारे स्टील बँडही त्यात आहेत. तेही एक नव्हे तर अनेक, अगदी वाक्यागणिक पूर्णविरामाप्रमाणे. त्यात शोभायमान फॅन्सी परेडसुही आहेत. नाना रंग–ढंगाचे उभे व आडवे धागे गुंफलेले व गुंतलेले आहेत. सगळ्यांचा मिळून असा नेत्रदीपक देखावा बनतो की कुठे जलसा संपला व कुठे जुलूस सुरू झाला याचा संभ्रम पडावा. स्त्री–पुरुष हा भेद लोपलेला आहे. लहान मोठा फरक राहिलेला नाही. केवळ तद्देशीय आशय व विषय यावरच भर देऊन किंवा आधारून वातावरण कोंदट किंवा बंदिस्त झालेले नाही. परदेशीय रंगेल व रूचकर अभिव्यक्तीचा कशीदा त्या रंगपटात बेमालूम एकजीव व समरस झाला आहे. इंद्रधनुष्यातील विविध रंगाचे कुणालाही खिळवून टाकणारे ते एक चालते–बोलते–गाते अप्रतिम प्रतिक व प्रात्यक्षिक बनलेले आहे. म्हणूनच कुठे क्लिओपात्रा नव्या नौकेत विहार करताना दिसेल तर कुठे फ्रेन्च सम्राट १४ व्या लुईचा रंगेल दरबारही दिसेल तर अन्यत्र कुठे मरी अंत्वानतची प्रणयक्रीडाही झळकेल.

असे हे कार्निवल त्रिनिदादकरांचे वास्तवात उतरणारे एक अनुपम स्वप्न वर्षातून एकदा पडते व चटका लावून जाते. जनमानसाचा ओढा तुडुंब भरतो. वर्षभर त्या स्वप्नास साकार करण्याची तयारी चालू असते. किंबहुना यंदाचा उत्सव संपला की पुढच्या वर्षाच्या सणास प्रारंभ होतो. आपल्याकडील सार्वजनिक गणपत्युत्सवाप्रमाणे तेथेही समस्तजन निरनिराळे क्लब स्थापून आपआपल्या योजना आखत व मार्गस्थ करीत असतात. स्थानीय जनतेला वर्षभर त्याचे वेध लागलेले असतात. पण दूरस्थ व परस्थ प्रेक्षकालाही तेच वेध लावण्याइतका हा अद्वितीय महोत्सव आहे.'या सम हेचि' अशीच भावना होते व ह्या कॅलिप्सो बेटांचा किनारा सोडल्यानंतर अनेक दिवस हा कार्निवल 'मधुमासा'प्रमाणे मनात रेंगाळत राहतो.

● ● ●

( पान ४७ वरून )

फलंदाज आपली बॅट पुढे घालून चेंडू अडवितो. झेल उडतात पण ते भुईसरपट असल्यामुळे पकडणे मुश्किल असते. आपल्याकडे पूर्वी कॉयर मॅटिंगवर सामने होत. त्या खेळपट्टया गोलंदाजांना विशेषतः द्रुतगती गोलंदाजांना अनुकूल असत. आजच्या आपल्या खेळपट्टया ह्या प्रामुख्याने फिरकी गोलंदाजाना अनुकूल आहेत. ज्या एखाद्या मध्यमगती गोलंदाजाला संधी मिळते (कसोटी सामन्यात) त्याच्या वाटणीला चार पाच षटके येतात त्यात त्याला वळी मिळाले तरच त्याचा त्याला पुन्हा संधी मिळणार."

"योजना आखून आणि तुम्ही म्हणता त्याप्रमाणे त्याच्या योगक्षेमाची काळजी घेऊन चांगले द्रुतगती गोलंदाज भावी काळात तयार होतील ?"

"कां होणार नाहीत ?" अर्थात अभिजात लेखकाप्रमाणेच चांगले क्रिकेटपटू हे जन्मावे लागतात. त्यांना उपजतच आवड हवी. निसारप्रमाणे जागतिक कीर्तीचे द्रुतगती गोलंदाज कदाचित निर्माण होणार नाहीत. परंतु फडकर, रंगाचारी, यांच्यासारखे तर्जेदार, सामने जिंकून देणारे, मध्यम द्रुतगती गोलंदाज नक्कीच तयार होतील. मात्र त्यांना संधी द्यायला हवी. आणि श्री. रंगा सोहोनी म्हणतात त्याप्रमाणे कसोटी सामन्यातील निवड गुणवत्तेवरच व्हावी.

● ● ●

## 'कादंबरिका' (Novelette) लेखकांना आवाहन

'दीपावली' येत्या मार्चपासून रजत-महोत्सवी वर्षात पदार्पण करीत आहे. त्यानिमित्ताने काही नवनवे उपक्रम करण्याचे योजिले आहे. मार्च १९६९ च्या अंकापासून 'दीपावली'च्या प्रत्येक अंकात 'कादंबरिका' (नॉव्हेलेट) प्रसिद्ध करणे हा त्या उपक्रमाचाच एक भाग आहे. तेव्हा आपली निवडक 'कादंबरिका' दीपावलीकडे पाठवावी असे आम्ही आवाहन करीत आहो. 'कादंबरिका' दीपावलीच्या छापील २५ पानांपेक्षा (सुमारे २० हजार शब्द) मोठी नसावी हे कृपया ध्यानी घ्यावे.

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without prepayment DECEMBER 1968





Cover Printed At Asha Printery, Bombay-4.